# अनुक्रमाणिका.

# मी कवि* कसा झालों ?

लहानपणीं कविता करण्याचा नाद मला कसा लागला याचा मी आतां विचार करूं लागलों म्हणजे मला मौज वाटते. एकाद्या गोष्टीकडे आपल्या मनाचा कल कसा वळतो याची कारणमीमांसा इतरांनीं करणें हें सोपें नसलें तरी त्याबाबतींत स्वतःला आपल्यापुरता पडताळा करून पहातां येण्यासारखा आहे. अनुवंशिक संस्कार व परिस्थितीचा परिणाम या दोहोंपैकीं बलिष्ठ कोण यासंबंधीं निष्कर्ष मानसशास्त्रांत अद्यापि लागला नसला तरी जिज्ञासा व अवलोकन या दोन उपजत प्रवृत्ति जर विशेष प्रखरतेनें प्राप्त झाल्या असतील, तर भोंवतालच्या परिस्थितीप्रमाणें कल्पनाशक्तीची घडण आपोआप होऊं लागते असा माझा अनुभव आहे.

काव्यप्रसिद्धीसाठीं जरी मी वडिलांचें नांव घेतलें आहे तरी काव्याची व माझ्या वडिलांची शालेयसृष्टीबाहेर उभ्या हयातींत तरी गांठ पडली असेल किंवा नाहीं याची मला शंका आहे. कुळकर्णी, दुष्काळी कारकून, पोलीस कॉन्स्टेबल, म्युनिसिपालिटीचे सेक्रेटरी अशा एकाहून एक वरचढ गद्य आणि रुक्ष धंद्यांत त्यांचें आयुष्य गेलें. काव्याचा एकादा चरण देखील स्वतःशीं गुणगुणतांना मी त्यांना कधीं ऐकलें नाहीं. आईच्या घराण्यांत मात्र गाण्याची आवड भरपूर होती. माझे मामा नं. ३ हे चांगल्यापैकीं भजनी गाणारे होते व भजनाच्या फडांत खड्या पहाडी आवाजांत किंचाळून अभंग म्हणत असतांना शिरा ताणल्यामुळें केविलवाणा दिसणारा त्यांचा चेहेरा अद्यापि माझ्या स्मरणांत आहे. तेव्हां गाण्याची आवड व थोडासा गळा ( जो आतां कांहीं फारसा शाबूत नाहीं ) या गोष्टी माझ्या आईकडून मला मिळाल्या. म्हणूनच लहानपणीं प्राथमिक शाळेंत असतांना बक्षिससमारंभाचे वेळीं जरीच्या टोप्या डोक्याला घालून

---

* ‘ कवि ’ ही पदवी स्वतःकडे लावून घेतल्याबद्दल रसिकांची क्षमा मागून—

व हात जोडून आणि माना वांकव्या करून स्वागतपद्यें म्हणणाऱ्या मुलांच्या ताफ्यांत मला वेळोवेळीं स्थान मिळत गेलें.

यावेळची एक मनोरंजक आठवण अद्यापि मला आठवतें, ती अशी कीं ‘ब्रॅंडर’ नामक एक कलेक्टरसाहेब आमच्या मराठी शाळेंत एका बक्षिस समारंभास सपत्नीक आले असतां त्यांच्या स्वागतासाठीं आमच्या मास्तरांनीं “झाला अतिशय आनंदचि या क्षणिं आम्हां। उपकार बहुत हे ॥ धृ० ॥ ब्रॅंडरसाहेब येति इथें। संगें घेउनि आपुली कामिनि। जणुं सौदामिनी ॥१॥” असें एक पद्य निर्माण केलें. तें आम्ही रीतीप्रमाणें हात जोडून व शक्य तितके बावळट चेहरे करून म्हटलें. पुढल्या वर्षी कार्मायकेलसाहेबही सपत्नीक आले. पद्यकार मास्तरांची तेवढ्या अवधींत बदली झाली होती. तेव्हां नव्या मास्तरांनीं जुन्या पद्यांत “कार्मिकेल हे येति इथें। संगे घेऊनि आपुली कामिनी। जणुं सौदामिनी ॥” अशी तात्पुरती डागडुजी करून काम निभावून नेलें. तिसऱ्या वर्षी सेज्विकसाहेब आले. ते अविवाहित होते. साहेबाचें नुसतें नांव बदलावयाचें व तेंच गाणें पुन्हां म्हणावयाचें हा शिरस्ता आतां आम्हांला माहित झाला होता. ‘कामिनी–सौदामिनी’ ही भानगड कळण्याइतका शहाणपणा आम्हांला त्यावेळीं कोठून असणार? आम्ही सेज्विकसाहेबाकडे हात करून “सेज्विकसाहेब येति इथें। संगें घेऊनि आपुली कामिनी। इ.” ओळी मोठमोठ्यानें म्हणूं लागलो, त्याबरोबर समंजस सभाजनांत एकच हंशाचा गहजब उडाला. गाण्यांत आपल्या गौरवाचा कांहीं मनोरंजक भाग आहे असें समजून साहेबमजकुरांनींही हंसत टाळ्या वाजवल्या व आमुचें कौतुक केलें. समारंभ संपताच व्हर्नाक्युलर फायनल परीक्षा पास झालेल्या व म्हणून आपण आतां मास्तरच्या बरोबरीला आलों असा भ्रम झालेल्या एका मिशाळ विद्यार्थ्याला मी हंशाचें कारण विचारलें, तेव्हां त्यानें ‘कामिनी’ शब्दाला लोक हंसलें असें मला सांगितलें. ‘कामिनी’ म्हणजे काय असें मी त्याला विचारतांच ‘कामिनी म्हणजे मड्डम’ असें त्यानें सांगितलें. ‘कामिनी म्हणजे मड्डम’ हा त्या शब्दाचा अर्थ पुढें कित्येक वर्षेपर्यंत तरी माझ्या डोक्यांत घोळत असे.

अशा रीतीनें कोणत्या का कारणामुळें होईना, पदाशीं व गाण्यांशी माझा फार लहानपणीं संबंध आला. गाण्याचीं कडवीं मनांत गुणगुणतांना कित्येक वेळां कांहीं शब्द मनाला विशेष लागून रहात व त्याचा अर्थ काय असावा याचा मी स्वतःशीच विचार करीत असे. त्यामुळें कित्येक वेळां फार मौजेच्या अडचणी उत्पन्न होत. ' नमितो चराचर विश्व सकल हें व्यापित जो त्यातें ' या एका प्रार्थनेच्या पदांतील शेवटचे दोन शब्द मी ' जोत्यातें ' असें एकत्र करून म्हणत असें व त्यामुळें परमेश्वराचा व घराच्या जोत्याचा काय संबंध असावा याबद्दल माझ्या मनांत लहानपणीं मोठें कुतूहल उत्पन्न होऊन राहिलें होतें.

१९०७–८ च्या सुमारास मेळ्यांची व त्याचबरोबर पदांची एक प्रचंड लाट महाराष्ट्रावर येऊन गेली. आमच्या गांवावरही तिचा चांगला जोराचा शिडकावा बसला. पुण्याला त्या वेळीं जे मेळे निर्माण झाले त्यांनीं बनविलेल्या पदांची शिदोरी आमच्या गांवांतल्या मेळ्यांच्या म्होरक्यांनीं पळवून आमच्या गांवठाणांत आणली. गांवठी कवींच्या अभावीं अजूनही पुष्कळ ठिकाणीं हाच शिरस्ता चालू असतो असें म्हणतात. मेळ्यासाठीं विशिष्ट पोषाख तयार करण्याइतकी ऐपत त्यावेळीं पुढाकार घेणाऱ्या मंडळींत नसल्यामुळें डोक्यावर भग्याच्या पांढऱ्या टोप्या व हातांत घुंगराच्या लाल टिपऱ्या ( व खालीं कमरेला लंगोटीच ) एवढ्याच थाटामाटावर आम्हां बालबटूंची मिरवणूक गांवांतून निघूं लागली. उत्साहापुढें पोषाखाची काय मिजास ? मेळ्यांची पदें तोंडपाठ व्हावयाला कांहींच उशीर नव्हता. "सन् सोळाशे सत्ताविसावें सालीं । शिवनेरी किल्लीं । शिवाजी जन्मला । " हे गाणें त्यावेळीं फार लोकप्रिय ! ( ' किल्लीं ' हें किल्ल्याचें सप्तमीचें रूप बनविणारा जो कोणी शाहीर असेल त्याच्या व्याकरणाच्या ज्ञानाची आठवण झाली की अजून तोंडांत बोट घालावेसे वाटते. ) तसेंच ख्रिश्चन व्हावयास जाणाऱ्या मुलाचा व त्याला वाटेंत भेटलेल्या एका हिंदुधर्माभिमानी माणसाचा पद्यमय संवादही त्यावेळीं प्रत्येकाला मुखोद्गत झालेला होता.

## मी कवि कसा झालों ?

" जातसे ख्रिस्ति व्हायाला
मज नाहिं अन्न खायाला ! "

हे त्या मुलाचे करुणोद्गार व ख्रिस्ति झालास तर—

" तुज मिळेल म्हारिण कोणी
काळुंद्री घुबडावाणी ! "

ही त्या इसमानें त्याला दिलेली भयाची सूचना या गोष्टी मनावर दीर्घकाळ परिणाम करतील अशाच होत्या. निदान माझ्या मनांवर तरी या मेळ्यांच्या पदांनीं विलक्षण परिणाम केला. बऱ्याचशा गेय चाली व वृत्तें या निमित्तानें आपोआप मुखोद्गत झालीं. तथापि, पद्यरचनेच्या वाटेला जाण्याइतका धीटपणा माझ्या अंगांत तोंपर्यंत नव्हता तो त्याच सुमारास एका कारणामुळें आला. त्याच वर्षी मी इंग्रजी पहिल्या इयत्तेंत प्रवेश केला असल्यानें इंग्रजी शब्दांचे मला व माझ्या बरोबरीच्या इतर सोबत्यांना अपूर्व कुतूहल वाटत होते. शहरांतील एका इंग्रजी शाळेंत वरच्या वर्गांत शिकत असलेला एक विद्यार्थी गणपतीच्या सुट्टींत आमच्या गांवीं एक विलक्षण काव्य घेऊन आला :

" टेल फादरला ।
किं गणपति थ्रोनावरि सिटला ! "

हें पद आपण स्वतः बनविलें असें तो सांगे. ( अर्थात् आतां माझा या गोष्टीवर विश्वास नाहीं. ) हें पद ऐकून पद्यरचनेच्या संबंधीं आम्हांला जो निष्कारण बाऊ वाटत होता तो साफ नाहींसा झाला व इंग्रजी—मराठी शब्दांची बालंबाल भेसळ करून पद्यें निर्माण करणें म्हणजे हातचा मळ आहे अशी आमची बालंबाल खात्री झाली. त्यामुळें गांवांत दरोबस्त घरांत अनेक घेडगुजरी शाहीर स्वयंस्फूर्तीनें निर्माण झाले. मी तर सर्वांच्या पुढें आघाडी मारली व माझ्या माहितीच्या एका लंगड्या व ताकभाकरीची विलक्षण आवड असलेल्या आणि मोठमोठ्यानें हंसणाऱ्या आमच्या वडिलांच्या मित्रावर माझ्या दोनतीन सोबत्यांच्या सहाय्यानें एकदम इंग्रजींतच कविता करून टाकली. ती अशीः

# मी कवि कसा झालों ?

"Crippling-crippling walks up a man,
Laughing crying Ha, Ha, Ha !
Liking daily butter-milk bread,
Laughing crying Ha, Ha, Ha !"

इंग्रजी पहिलींतील नऊ दहा वर्षांच्या मुलानें बनविलेले हें अद्‌भुत इंग्रजी काव्य वाचून व ऐकून गांवांतील समस्त नागरीकवृंद तर चाटच झाला ! मात्र ज्या लंगड्या गृहस्थावर हें काव्य निर्माण झालें तो गृहस्थ इंग्रजी न समजतां देखील इतका संतापला कीं आपला लांकडी पाय हातांत घेऊन माझ्या मागें लागण्याचेंच काय तें त्यानें बाकी ठेविलें ! आम्ही मात्र या गाण्याच्या भांडवलावर त्या तैमूरलंगाचा कित्येक दिवसपर्यंत 'अमानुष' छळ केला. आमच्यापैकीं दहावीस मुलांनीं हें गाणें तोंडपाठ केलें व तें 'कोरस !' प्रमाणें एका सुरानें व भसाड्या आवाजानें ओरडत त्या माणसाच्या मागून आम्हां बाळगोपाळांचा तांडा गांवातून कित्येक दिवसपर्यंत फिरत असे.

पुढें थोड्या दिवसानें आमच्या गांवांतील एका देवळांत एक हरदासी आला. त्यानीं एका सासुरवासिणीच्या तोंडचें एक विनोदी गाणें आपल्या कथेंत म्हणून दाखवलें; "भवानिआई, रोडगा वाहिन तुला। नणदेचे कारटें किरकिर करतें रोग होऊं दे त्याला!" एवढ्या दोन ओळीं आतां मला आठवतात. हें गाणें गांवांत ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें. मला ही चाल इतकी आवडली कीं त्या चालीवर मी एका सीताबाई नांवाच्या वृद्ध व एकाक्ष स्वयंपाकिणीवर ताबडतोब कविता बनविली. हीच माझी पहिली मराठी कविता असें म्हणावयास हरकत नाहीं. या माझ्या 'अपूर्व' काव्याच्या आतां मला फक्त दोनच ओळी आठवतात. त्या अशा:

"सीताबाई, वर्णू किति तव गुण।
डोळा काणा नाक वांकडें बधिर असति तव कर्ण ॥"

एकाद्या दहा वर्षांच्या मुलानें जर मला अशा ओळी रचून आज दाखविल्या तर मी त्याला चांगलीच शाबासकी देईन. माझ्या काव्यप्रकाश-

नाचा आरंभ पुढें जरी गंभीर कवितांनीं झाला असला, तरी माझ्या काव्य-लेखनाची खरी सुरुवात व्यंगांचा उपहास करणाऱ्या या उपरिनिर्दिष्ट विनोदी कवितांनींच झालेली आहे. व्यंगांची काव्यांत टवाळी करण्याची हीं खोड मला फार लहानपणापासून जडलेली आहे ही गोष्ट जर मी येथें कबूल केली तर माझ्याशीं विरोधी भक्ति दाखविणाऱ्या माझ्या हल्लींच्या मित्रांना फार आनंद होईल आणि मी हें सुख त्यांना द्यावयास तयारहि आहे.

तथापि, आपण केलेलें काव्य मुद्रणसृष्टींत छापून येण्याची सोय असते याची त्यावेळीं मला लवमात्रहि कल्पना नव्हती. गाण्यासाठीं किंवा म्हणण्या-साठीं काव्य करावयाचें एवढीच माझी तेव्हां समजूत असे. आमच्या गांवांत ख्रिस्ती मिशननें गांवकऱ्यासाठीं एक लहानसें वाचनालय उघडलें होतें. त्यांत 'मासिक मनोरंजन'चे कांहीं जुने अंक मला वाचावयाला मिळाले. या वाचनानें माझ्या आयुष्यांत क्रांति घडवून आणली व मला लेखक होण्याची स्फूर्ति दिली. त्या वेळच्या 'मनोरंजनांत' छापून येणाऱ्या रे. टिळक, कै. मुजुमदार, प्रो. बोकील इत्यादि कवींच्या कविता मला समजण्याइतकें माझें भाषेचें ज्ञान त्यावेळीं नव्हतें; तथापि कविता छापून आलेली दिसली कीं ती पाठ करून गात सुटायचें हा नाद मला लागला व त्यामुळें माझें पाठांतर वाढूं लागलें. तथापि, धंदेवाईक कवीला लागणारीं सोंगें म्हणजे जगाविषयीं बेफिकीरपणा, विचाराच्या तंद्रींत तासचे तास धुंदींत रहाणें, अंतःकरणांत कांहीं तरी गोड हुरहूर चाललेली आहे अशी भावना वाटणें व कोणातरी काल्पनिक रमणीच्या विरहानें आपण रात्रंदिवस तळमळत आहोंत अशी जाणीव करून घेणें इत्यादि गोष्टी मला इतक्या अल्पवयांत साध्य होणें शक्य नव्हतें; पण प्रणयाच्या व गोड हुरहुरीच्या सरहद्दीवर मला पोहोंचविण्याचें श्रेय 'मनोरंजन'मध्येंच छापून आलेल्या 'जुलिया-दलिया'नामक मोंगल बादशहाच्या अंतःपुरांतील एका हृदयद्रावक प्रणयकथेला मी देतो. विशेषतः, त्या गोष्टींतील 'दुखया में कैसें कहुं मोरे सजनी' या एका ओळीनें अंतःकरणांत कांहींतरी विलक्षण मधुर व अननुभूत भावना उत्पन्न केली. या ओळीचा अर्थ मला त्यावेळीं कळत नव्हता आणि अजूनही मला नीट

कळतो असें सांगता यावयाचें नाहीं. तथापि, ही ओळ तासचे तास मी स्वतःशीं गुणगुणत असे व ती गुणगुणतांना जिवाला झालेल्या कसल्या तरी काल्पनिक तीव्र यातनावर गोड व थंडगार फुंकर पडत आहे अशी भावना होई. वाचलेल्या गोष्टींतील काल्पनिक पात्रांच्या निरनिराळ्या भावना व विचार आपल्या स्वतःच्या अंतःकरणावर लादून त्यांतच एक प्रकारचें सुख मानून घेण्याची संवय मला या वेळेपासून लागली. प्रणयाची भावना वयपरत्वें अंतःकरणांत उद्भूत होण्यापूर्वीच कितीतरी आधीं त्या विकाराची वाङ्मयीन माहिती काव्यांतून व गोष्टींतून जमा करून मी आपल्या कल्पनेच्या कोठारांतून सांठवून ठेविली होती. व याच भांडवलावर माझ्या पुढील प्रेमकाव्याची आरास मी थाटली.

वाचनाचें विलक्षण वेड मला या वेळेपासून लागले. माझ्या सुदैवानें मला त्या वेळीं वाङ्मयाची आवड असणारे असे एक रा. महादेव रामचंद्र सुभेदार नांवाचें शिक्षक लाभले. हे हरिभाऊ आपट्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या मराठीच्या तासाला हप्त्याहप्त्यानें सांगत व त्यामुळें माझ्या कल्पनाशक्तीची जोपासना होण्यास अतोनात मदत झाली. या ठिकाणीं एक मौजेची आठवण सांगावीशी वाटते. ‘ अशा समयीं एक व्यक्ति लपत छपत चालली होती—’ असें उल्लेख हरिभाऊंच्या कादंबरींत अनेक ठिकाणीं आले आहेत. ‘ व्यक्ति ’ या शब्दाचा अर्थ मला कळत नसल्यामुळें मी वर्गांतील एका ज्येष्ठ विद्यार्थ्यास विचारला. तेव्हां तो अत्यंत गंभीर चेहेरा करून म्हणाला, “ व्यक्ति हा मराठी भाषेंतील अत्यंत भयंकर शब्द आहे. व्यक्ति या शब्दांत काय वाटेल तो अर्थ येऊं शकतो. तूं व्यक्ति आहेस–मी व्यक्ति आहे–सारेजण व्यक्ति आहेत ! व्यक्ति कोण नाहीं ? ” या स्पष्टीकरणामुळें व्यक्ति या शब्दांची मला कित्येक दिवसपर्यंत दडस बसली व पुढें केव्हां तो शब्द वाचण्याचा प्रसंग आला तर मी डोळे मिटून तो शब्द टाळीत असे.

१९१० च्या डिसेंबरमध्यें मी पुण्यासि पुढील अभ्यासास आलो व भावे स्कूलध्यें इंग्रजी चवथ्या इयत्तेंत दाखल झालों. माझ्या वर्गांत बालकवि ठोमरे यांचे धाकटे बंधू रा. बाबूराव ठोमरे होते. ‘ मनोरंजन ’च्या त्या वर्षाच्या

## मी कवि कसा झालों ?

दिवाळीच्या अंकांत बालकवींची ' ओवाळणि घाली भाई ' ही अत्यंत हृदयंगम कविता छापून आलेली होती. या कवितेनें मला काव्याच्या अद्भुतरम्य वातावरणांत वाहून नेलें व माझ्या प्रतिभेला जागृत केलें. या कवितेची आठवण झाली कीं माझें मन अद्यापिही हर्षभरित होतें.

" सुखशयनीं मी निजले होते बाई,
स्वप्नें मज पडली कांहीं !
त्या स्वप्नांच्या मनोमयीं लीलींहीं
मन माझें गुंगुनि जाई !
तो आकाशीं शशांक ये उदयाला,
पूर्वेला हांसविण्याला !
मधुकौमुदिचें क्षौम धवल नेसोनी,
नटली ती होती रजनी !
तों मेघ भराभर आले—गे
चपलेनें कंपित केलें
हस्तातिल चित्र गळालें. " इ. इ.

या एकाहिपेक्षां एकेक रसाळ ओळी वाचून भावनेच्या अत्यंत नाजुक ताराहि हर्षकंपित झाल्याशिवाय रहाणार नाहींत. ही हृदयंगम कविता रचणाऱ्या कवीचा भाऊ आपल्या वर्गांत आहे असा शोध लागल्यावर माझ्या आनंदाला पारावारच उरला नाहीं. बालकवि कसे दिसतात. कसे बसतात, कसे लिहितात, काय वाचतात, काय करतात इत्यादि बारीक सारीक गोष्टीची चौकशी करून मी त्यावेळीं बाबूराव ठोमऱ्यांना भंडावून सोडलें असेल. बालकवि आजारी असतांना अंथरूणांत पडल्या पडल्या त्यांनीं ही कविता लिहिली व ' मनोरंजन ' चें संपादक रा. काशीनाथ रघुनाथ मित्र यांची त्यांना पत्रेंहि येतात अशा गोष्टी मला ' अरबी भाषेंतील सुरस गोष्टी ' इतक्या अद्भुत व रसाळ वाटत असत. एके दिवशीं मधल्या सुट्टींत शाळेंतून मी बाबूरावांच्या बरोबर बालकवींच्या घरीं गेलों; बालकवीशीं

ओळख करून घेण्याच्या किंवा त्यांच्याशीं बोलण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं. तथापि, त्यांचे हरणासारखे काळेभोर तरळ व टपोरे डोळे बघून व मनांत चालणाऱ्या विचारांच्या सूक्ष्म स्पंदनामुळें होणारी त्यांच्या बुबुळांची तेजस्वी हालचाल पाहून मी मोहितच झालों असें म्हणायला हरकत नाहीं. त्यांच्या खोली बाहेरील सज्जांत फाडून टाकलेली बरीचशी कागदाचीं चिटोरीं पडलेलीं होतीं. त्यांच्यावरील बालकवींचें वळणदार ठळक अक्षर बघून त्यांनीं ती लिहून फाडून टाकलेलीं कविता असावी असें मी ताडलें. अशा तऱ्हेच्या किती तरी कविता ते रोज रचतात व फाडून टाकतात असें मला बाबूरावांनीं सांगितलें. तें ऐकून तर मला अतिशयच कौतुक वाटलें. घरीं आल्यानंतर मी रोज वळणदार अक्षरांत कविता लिहावयाचा व त्या स्वतःच्या हातानीं फाडून टाकून ती चिटोरीं कशी दिसतात हें पहात रहावयाचा. अर्थात्, मी त्यावेळीं लिहिलेल्या कविता फाडून टाकावयाच्याच लायकीच्या होत्या ही गोष्ट निराळी. या सुमारास ‘ सद्गुणी माधव ’ ‘ मंजुगुंजावली ’ या गोष्टींच्या पुस्तकामुळें त्यावेळीं प्रसिद्धीस आलेले रा. भीमराव खंडेराव कोरान्ने यांची माझी गांठ पडली. ते गोष्टी लिहून मासिकाकडे पाठवितात व त्यांच्या गोष्टींचा बोलबाला होतो हें पाहून माझ्याही मनांत प्रसिद्धीची हांव उत्पन्न झाली. इंग्रजी चवथ्या रीडरमधें असलेल्या टेनिसनच्या ‘ Break, Break, Break’ कवितेचें मी साकीवृत्तांत भाषांतर करून ती कविता मी ‘ मासिक मनोरंजना’ कडे त्यांच्या नियमाप्रमाणें मार्जिन राखून कागदाच्या एका बाजूवर सुवाच्य अक्षरांत लिहून व सोबत उत्तरासाठीं पोष्टाचें तिकीट लावून पाठवून दिली. दोनचार दिवसांत मासिक मनोरंजनाचें वर इंग्रजी नांव असलेलें एक पाकीट मला पोष्टांतून आलें. मोठ्या आशेनें व उत्सुकतेनें मी तें पाकीट फोडून आंत पाहिलें, तों माझी पूर्वोक्त कविता कोपऱ्यावर ‘ Returned with thanks’ असा तांबड्या अक्षरांत शेरा धारण करून परत पित्याला भेटावयाला माहेरीं आलेली होती. तथापि, त्यामुळें माझ्या मनाला फारसा जबरदस्त धक्का बसला नाहीं. उलट, त्याचेंच मला मोठें कौतुक वाटलें. माझ्या आयुष्यांत मला

आलेलें तें पहिलेंच पत्र असल्यानें, व शिवाय तें 'मासिक मनोरंजना'च्या ऑफिसांतून मला आलेलें असल्यानें त्या पत्राचा लिफाफा मित्रानां मोठ्या अभिमानानें कित्येक दिवसपर्यंत तरी मी दाखवीत असे. मात्र त्यानंतर त्या किंवा दुसऱ्या कोणत्याच मासिकाकडे कविता पाठविण्यास मी मुळींच धजलों नाहीं.

मी ज्या शाळेंत शिकत होतों म्हणून वर सांगितलें त्या शाळेंत माझ्या सुदैवानें कै. विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री राशिवडेकर, 'दर्पदर्पण' कर्ते कै. दामोदरपंत चिपळूणकर, 'तुकाराम' कर्ते कै. वासुदेव रंगनाथ शिरवळकर, श्री. विद्याधर वामन भिडे असे विद्वान् व वाङ्मयव्यासंगी शिक्षक मला लाभले व त्यांच्या सान्निध्यानें व उदाहरणानें माझी वाङ्मयासंबंधीची व विशेषतः काव्यासंबंधीची आवड वाढत चालली. 'मौनयौवना' या 'नाईट क्लब' तर्फे प्रसिद्ध होणाऱ्या कादंबरीचीं प्रुफें कै. शिरवळकर हें आम्हांला वर्गात शिकवितां शिकवितां तपाशीत असत. तें पाहून मला फारच आनंद होई. कारण, मुद्रणकला हा माझ्या कौतुकाचा विषय असे. त्यांच्या टेबलावर जाऊन ते प्रुफें कशी तपासतात हें पहात मी उभा राहीं. संस्कृत सुभाषितें देऊन त्यांचें सुलभ मराठी भाषांतर घरून करून आणण्याची कामगिरी कै. राशिवडेकरशास्त्री मला सांगत, तर 'राघवीय–परिवाह' व 'दंडदंडना' हीं आपलीं काव्यें मला विकत घ्यावयाला लावून त्या धर्तीवर काव्यरचना करण्याचीं ताकीद मला रा. विद्याधर वामन भिडे हे नेहमीं देत असत. 'चटका' म्हणजे 'चिमणी' व 'फेरू' म्हणजे 'कोल्हा' हें मी रा. भिड्यांच्याच काव्यावरून प्रथम शिकलों; राशिवडेकरांच्या सांगण्यापेक्षां भिड्यांच्याच म्हणण्याचा व त्यांच्या काव्यकृतीचा माझ्या मनावर अधिक परिणाम झाला व तेव्हांपासून बिकट संस्कृत शब्द वापरल्याशिवाय काव्य करावयाचें नाहीं असा मी निश्चय केला. इंग्रजी किंवा संस्कृत कविता घ्यावयाच्या व आपट्यांच्या गीर्वाणकोशाच्यां सहाय्यानें त्याचें संस्कृतप्रचुर मराठींत भाषांतर करावयाचें हा मी कांहीं काळ उद्योग आरंभिला. 'जानकी हरण' काव्यांतील 'सिद्धाश्रमवर्णना'चा भाग मी माझ्या चुलत्यांकडून

समजावून घेऊन कोशाच्या सहाय्यानें त्याचें संपूर्ण मराठींत भाषांतर केलें. भिड्यांच्या क्लिष्ट व संस्कृतखचित रचनापद्धतीचा माझ्या काव्यलेखनावर किती परिणाम झाला होता, हें मला आतां आठवत असलेल्या माझ्या पुढील फक्त दोन ओळीवरूनच कळून येण्यासारखें आहे.

" वारि सिंचती कनकवालुनें तरुसी मुनिबाला,
तरुवरि बसुनी शिखंडि गाती सामगानमाला ! "

यांत वारि=पाणी, सिंचति=शिंपडतात, कनकवालु=सोन्याची झारी व शिखंडि=मोर हे शब्द पाहून खुद्द भिड्यांनीं हा पोरगा मराठी भाषेंत आपल्या सवाइ कवि होणार असें भाकित केल्याचें मला स्मरतें. ही कविता तयार झाल्यावर ती सुवाच्य अक्षरांत लिहून मी ' चित्रमयजगत् ' मासिकांत घेऊन गेलों. याच मासिकाकडे जाण्याचें कारण म्हटलें म्हणजे कसबा पेठेंत मी जेथें रहात होतों, तेथें प्लेग झाला असल्याकारणानें आम्ही सदाशिव पेठेंत चित्रशाळेच्या शेजारीं रहावयास गेलों होतों. बारा तेरा वर्षांचें एक बावळट पोर कविता घेऊन ती मासिकांत छापा म्हणून सांगावयास आलेलें पाहून रा. वासुकाका जोशांना त्यावेळीं चांगलाच धक्का बसला असेल. त्यांनीं मला पायापासून डोक्यापर्यंत नीट न्याहाळलें व एक महिन्यानें येऊन जा म्हणून सांगितलें. महिन्यानंतर मी ऑफिसांत गेलो. संपादकावर जरा वजन पडावें म्हणून बरोबर माझ्या थोरल्या चुलत्यांना घेतले होते. पण तेथें जातांच माझ्या अपेक्षेच्या विरुद्ध माझ्या कवितेचें हस्तलिखित मला परत मिळालें ! अर्थात्, त्यावेळीं कविता समजणारी मंडळी त्या ऑफिसांत कामावर होती हें उघड आहे. कविता छापून नाहीं आली तर नाहीं, निदान 'चित्रमयजगत्'चा एकादा अंक तरी मुलाला द्या, असा हट्ट धरून माझे चुलते बसले; तेव्हां दोन-वर्षांमागचा एक जीर्ण अंक ( पातळ कॉपी ) मला बक्षीस देण्यांत आला व ती काखोटीला मारून मोठ्या आनंदानें मी घरीं परत आलों. ' चित्रमय-जगत् ' मध्यें लिखाण छापावयास देण्याची ती माझी पहिली व शेवटची वेळ.

मोठ्या मासिकांत नाहीं तरी नाहीं निदान लहान मासिकांत तर आपली कविता छापून यावयास कांहीं हरकत नाहीं, असा विचार करून शनिवार

पेठेंतील फुटक्या बुरुजासमोर त्यावेळीं ‘ ज्ञानमित्र ’ नांवाचें एक मासिक होते; त्या मासिकाचीं आद्याक्षरें काव्यांत ओळीच्या आरंभीं येतील अशा तऱ्हेचा एक श्लोक बनवून मोठ्या धोरणानें मी तें काव्य त्या मासिकाकडे रवाना केलें. माझी ही युक्ती हटकून यशस्वी होईल असा माझा कयास होता. पण या गनिमी काव्याची—आणि काव्याचीहि—त्या मासिकाच्या व्यवस्थापकांना पूर्णपणें दखलगिरी असल्यानें त्यांनीं कांहीं माझ्या युक्तिला दाद दिली नाहीं. बेकार मनुष्य ज्याप्रमाणें जिवावर उदार होऊन वाटेल त्या ठिकाणीं अर्ज करीत सुटतो, त्याप्रमाणें ‘ आपली कविता छापून येत नाहीं म्हणजे काय ? ’ या अपमानास्पद विचारानें खवळून गेल्यामुळें मी ‘ मुमुक्षु ’ पासून तों ‘ मराठामित्रा ’ पर्यंत सर्व दर्जाच्या मासिकांकडे व नियतकालिकांकडे शिमग्याच्या सणापासून तों तरुणीच्या प्रेमापर्यंत सर्व विषयावर लिहिलेल्या कविता सरास पाठवित सुटलों. पण सर्वच संपादक एकाहीपेक्षां एक खमंग ! रामबाणाप्रमाणें सर्व कविता आपल्या मूळ भात्यांत येऊन स्थानापन्न झाल्या. शेवटीं, एका ठिकाणीं मात्र बाण नेमका लागला आणि तो देखील माझ्या थोरल्या चुलत्यांच्या वशिल्यानेंच ! ‘शालापत्रका’चें काम बघणाऱ्या एका शिक्षकांशीं संधान बांधून ‘ श्रीमंत नारायणराव पेशवे यांचा वध ’ या मथळ्याची माझी एक कविता माझ्या चुलत्यांनीं त्या मासिकाच्या एका अंकांत छापून आणविलीच ! व अखेर एकदांचें माझ्या काव्यप्रकाशनाच्या मोहिमेस यश आलें व कवित्वाचा टिळा माझ्या कपाळीं कसा तरी लागला ! पहिलें फूल व पहिलें मूल याचा आनंद और असतो असें तज्ञ म्हणतात. कोणास ठाऊक ? पण आपली पहिली कविता छापून आलेली पहाण्यासारखा जगांत दुसरा कोणताही आनंद नसेल ! ती कविता कडेवर घेऊन मी किती तरी मित्रांच्याकडे फिरलो असेन व त्यांच्या मुखानें त्या कवितेचें कोडकौतुक करून घेतले असेन ! याच सुमारास मी एक ‘ महाराष्ट्र-मोहरा ’ नांवाची १५० पानांची कादंबरी लिहिली व ती ‘ सुरस ’ व ‘ सरस ’ ग्रंथमालांकडून फिरवून आणली. शेवटीं, ती स्वतः छापावी म्हणून त्यावेळीं तुरुंगांतून नुकतेच

दे. भ. शिवरामपंत परांजपे सुटून आले होते त्यांच्या छापखान्यांत घेऊन छपाईचे दर विचारण्यासाठीं गेलो. तेव्हां त्यांनीं ‘ असल्या भानगडींत एवढ्या वयांत न पडण्याची’ ताकीद दिली. शेवटीं ती, जुन्नर येथें त्यावेळीं प्रकाशित होणाऱ्या ‘ प्रेमोद्यान ’ नांवाच्या मासिकांत १९१४ सालीं क्रमशः प्रसिद्ध झाली; यावरून त्या मासिकाचा दर्जा कशा प्रकारचा असावा हें कोणालाही कळण्यासारखें आहे.

‘ शाळापत्रकां ’ त कविता छापून आली तरी कविता मासिकाकडे छापण्यास पाठविण्याचें पुढें मी सोडून दिलें व अर्वाचीन मराठी कवींच्या काव्याचें परिशीलन करावें म्हणून मी त्या नादाला लागलों. केशवसुतांची कविता त्यावेळीं एकत्रित स्वरूपांत प्रसिद्ध झाली नव्हती म्हणून मी पुण्याचा ‘ नेटिव्ह जनरल लायब्ररी ’ मधून जुने काव्यरत्नावलीचे सारे अंक जमविले व त्यांतून केशवसुतांच्या कविता उतरून त्याचें एक चांगलें लठ्ठ बाड तयार केलें. केशवसुतांच्या बहुतेक कविता मला त्यावेळीं तोंडपाठ येत होत्या. शाळेंतील अभ्यासक्रम संपवून मी फर्ग्यूसन कॉलेजमध्यें दाखल झालों. त्यावेळीं वर्षारंभ जूनपासून सुरू होणार होता. त्यामुळें आम्हांला सहा महिने जास्ती मिळाले. या वेळांत कॉलेज लायब्ररींतील बहुतक प्रख्यात इंग्रजी कवींचे काव्य संग्रह मी वाचून काढले. कॉलेजमध्यें त्यावेळीं मायदेव, सौ. वेणुबाई मोडक, काव्यविहारी, वि. कृ. नेरूरकर, सम्राळकर इत्यादि उदयोन्मुख कविकवयित्रि मंडळी होती. कॉलेजच्या मासिकांत आमच्या सर्वांच्या कविता प्रसिद्ध होऊं लागल्या व कॉलेजपुरता तरी आमच्या नांवाचा थोडासा बोलबाला झाला. त्यावेळीं ‘ मकरंद ’ या टोपण नांवानें माझ्या कविता प्रसिद्ध होत असत. प्रो. वै. का. राजवाडे तेव्हां कॉलेजमधून सेवानिवृत्त झाले त्यावेळीं त्यांच्या गौरवार्थ जो समारंभ भरला होता त्यावेळीं आमच्या सर्वांच्या कविता प्रसिद्ध झाल्या होत्या व त्या गाऊन दाखविण्यांत आल्यामुळें त्या त्या कवींच्या नांवाकडे विद्यार्थ्यांचें विशेषच लक्ष वेधलें.

## मी कवि कसा झालों ?

ह्या काळ म्हणजे गोविंदाग्रजांच्या कीर्तीच्या ऐन उत्कर्षाचा. वाङ्मयाच्या प्रत्येक प्रांतांत त्यांच्या नांवाच्या दुदुंभि त्यावेळीं दुमदुमत होत्या. ' मासिक मनोरंजन ' मधून प्रसिद्ध होणाऱ्या त्यांच्या प्रत्येक लेखावर व कवितेवर कॉलेजांतील तरुण विद्यार्थी वाचक आधाशीपणानें तुटून पडत. मी तर त्यांच्या लेखणींतून पडणारा प्रत्येक शब्द न शब्द मुखोद्गत करी. अर्थात् गडकऱ्यांशीं प्रत्यक्ष ओळख झाली तर मला किती धन्यता वाटणार होती हें सांगावयासच नको. आणि तो प्रसंग लवकरच आपोआप चालून आला. एके रात्रीं किर्लोस्कर थिएटरांत कोठलें तरी एक नाटक पहावयास गेलो असतां नाटक संपल्यावर मी पुढच्या बाजूस असलेल्या जोगळेकराचे हॉटेलांत चहा घेण्यास गेलो; इतक्यांत माझे स्नेही रा. भालचंद्र धडफळे हे गडकऱ्यांबरोबर चहा घेत एका टेबलाशीं बसले होते; त्यांनीं मला ताबडतोब दंडाला धरून गडकऱ्यांच्यापुढें उभे केलें व ते म्हणाले, " मास्तर, हा मुलगा तुमचा मोठा भक्त आहे बरं का आणि याला कविता करण्याचा पण फार नाद आहे ! " गडकऱ्यांनीं माझ्याकडे हंसून पाहिलें व मला दुसऱ्या दिवशीं त्यांच्या घरीं कवितेची वही घेऊन यावयाला सांगितलें. त्याप्रमाणें मी दुसऱ्या दिवशीं त्यांच्याकडे गेलों. माझ्या साऱ्या कविता मी एक वहीवर लिहिलेल्या होत्या व त्याला ' फुलबाग ' असें नांव दिलें होतें. त्या वहीचा पुठ्ठा थोडासा निसटला होता. वही हातांत घेतल्यावर गडकरी म्हणाले, " अत्रे, तुमच्या या फुलबागेला कुंपण जरा नीट घाला कीं ! " माझ्या कविता गडकऱ्यांनीं भराभर चाळल्या. त्यांचे मत जाणण्याविषयीं मी उत्सुक होतो पण ते कांहींच बोलले नाहींत म्हणून मी जरा हिरमुसलों. एवढेंच म्हणाले, " तुम्ही स्वतंत्र कविता लिहित जा. भाषांतरें करण्याच्या भानगडींत पडूं नका. आणि भाषा साधी व्हावी एवढ्यासाठीं लावण्या पोवाडे अभंग वगैरे वाचा. " गडकऱ्यांनीं सुरवातीलाच केलेला हा उपदेश मी कसोशीनें पाळण्याचा प्रयत्न केला व त्यानंतर ते जीं जीं सांगतील तीं तीं पुस्तकें वाचावयाची हा मी क्रम ठेवला.

गडकऱ्यांची बैठक म्हणजे वाङ्मयांतील पंचपक्वान्नांची चमचमीत मेजवानीच. निरनिराळ्या पुस्तकांत आपण वाचलेल्या गोष्टी, कल्पना, सुभाषितें आपल्या रसभरित व कोटीपूर्ण भाषेंत आल्यागेल्याला सांगत सुटावयाचें हा त्यांचा कार्यक्रम अष्टौप्रहर आपला चाललेला असे. गडकऱ्यांच्या व माझ्या पांच वर्षांच्या सहवासांत त्यांच्या ज्ञानाचा, वाचनाचा, तर्कपद्धतीचा व जगाकडे पहाण्याच्या त्यांच्या विशिष्ट वृत्तीचा मला जितका स्वतःला फायदा करून घेतां येणें शक्य होतें तेवढा मी करून घेतला. गडकऱ्यांनीं माझ्या प्रतिभेला नवीन दृष्टी दिली व मला लिहिण्याची कला शिकविली. गडकरी मला जर आयुष्यांत न भेटते तर मी श्री. विद्याधर वामन भिडे यांच्या शिष्यशाखेंत शोभण्याच्या लायकीचा एक कवि झालों असतो असें मला आतां राहून राहून वाटतें. कॉलेजमधील माझ्या चार वर्षांच्या आयुष्यक्रमांत मी अभ्यासाकडे एक दिवसही मनापासून कधीं लक्ष दिलें नसेल. कॉलेजांत हाजिरी देऊन जो पळ काढावयाचा, तो गडकऱ्यांच्या घरीं जाण्यासाठीं नाहींतर क्रिकेटची मॅच पहाण्यासाठीं. यापेक्षां मला इतर कोणत्याही गोष्टींत गोडी वाटत नव्हती. गडकऱ्यांच्या व माझ्या वयांत व विद्वत्तेंत इतकें अंतर असूनही त्यांनीं मला इतक्या चांगुलपणानें व आपुलकीनें कसें वागविलें याचा मला अजूनहि अचंबा वाटतो. त्यांच्या घरांत येणाऱ्या अनेक विद्वान् लेखकांना व कवींना ' आतां मला भेटावयाला वेळ नाहीं ' असें बऱ्याचशा तुसडेपणानें सांगून आल्यापावलीं मागें परतविलेलें मी त्यांना अनेक वेळां पाहिलेलें आहे. तथापि, मी केव्हांही वेळीअवेळीं त्यांच्याकडे गेलों तरी त्यांनीं माझा केव्हांही उपमर्द केला नाहीं. गडकऱ्यांच्या घरीं कै. तात्यासाहेब कोल्हटकर, कै. गोविंदराव देवल, ख्रि. वा. रे. टिळक, कै. बालकवि ठोमरे, कै. ग. वि. कुळकर्णी इत्यादि अनेक साहित्यसेवक मला प्रत्यक्ष पहावयास मिळाले व ज्यांची नांवें मी मासिकांतूनच फक्त वाचून मनांतल्या मनांत स्तंभित होत होतो ती थोर थोर मंडळी प्रत्यक्ष पहावयास मिळाल्यानें मला स्वतःला एक प्रकारची धन्यता वाटूं लागली.

## मी कवि कसा झालों ?

१९१६ सालापासून माझ्या कविता ' मासिक मनोरंजन ' मध्यें प्रसिद्ध होऊं लागल्या. तत्पूर्वी रचलेल्या सर्व कवितांची मी एके दिवशीं होळी करून टाकली. १९१६ ते १९२१ पर्यंत माझें काव्यलेखन अव्याहतपणें चाललेले होतें. माझ्या कविता विशेषेंकरून ' उद्यान ' ' नवयुग ' ' काव्यरत्नावली ' ' अरविंद ' व ' महाराष्ट्रसाहित्य ' या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या. माझ्या कवितांची संख्या तसें पाहिलें असतां फारच थोडी भरेल. तथापि, विपुल कविता लिहिण्याची ताकद माझ्या अंगीं नाहीं. एक एक कविता लिहावयास मला फारच मेहनत घ्यावी लागे. १९२३ च्या मे महिन्यामध्यें कांहीं विशिष्ट परिस्थितीमुळें माझें लक्ष विडंबन काव्याकडे अचानक वळलें व त्या सुट्टींत मी ' झेंडूच्या फुलां ' चा पुष्कळसा भाग लिहून काढला. या संबंधींचा इतिहास मी पुढें केव्हां तरी देणारच आहे. त्यानंतर आजपर्यंतच्या एक तपाच्या काळांत गंभीर अशा फार झालें तर पांचसातच कविता मी लिहिल्या असतील. येथपर्यंत माझ्या काव्याचा आरंभ व वाढ याबद्दलचा इतिहास झाला.

मी स्वतःला कोणी तरी एक महाकवि समजतो आहे अशी कृपा करून कोणीहि समजूत करून घेऊं नये . काव्यसंग्रहप्रकाशनाच्या निमित्तानें मला माझ्या काव्याची ही सारी कुळकथा सांगण्याची संधि मिळाली म्हणूनच मी हा सारा इतिहास सांगितला. यापेक्षां याचा कांहीं दुसरा हेतु नाहीं.

माझी सारी कविता मी केवळ स्वतःच्या हौसेखातर लिहिली आहे. कविता लिहिण्यांत मला अवर्णनीय आनंद वाटत असे. मनांत आलेली कल्पना किंवा विचार काव्यरूपानें व्यक्त केल्याशिवाय माझ्या अंतःकरणाला विरंगुळा वाटत नसे; म्हणून मी हा सारा उपद्व्याप केला सुरवातीला मला कविता लिहिण्यास फार त्रास पडत असे. मनांत एखादी कल्पना आली कीं झटकन् कोठल्यातरी वृत्तांत चारदोन ओळी त्यावेळीं तयार होत असत हें खरें. पण पुढें जी गाडी अडून बसे, ती कित्येक वेळा महिनेचे महिने देखील चालू होत नसे. मनांत येणाऱ्या निरनिराळ्या कल्पना योग्य शब्दांत प्रकट होतील अशा तऱ्हेचे अनुरूप शब्द मला एकदम आठवत नसत. प्रास जमवितांना तर माझी अतिशय तारांबळ

उडे. अशा तऱ्हेनें एकादी लहानशी कविता लिहितांना मला कागदचे कागद खर्च करावे लागत व कित्येक वेळां मला त्या कवितेचा नादही सोडून द्यावा लागे. तथापि, मनाप्रमाणें कवितेची रचना झाल्याशिवाय मी ती केव्हांही हाता-वेगळी करीत नसे. कविता लिहिण्यांत स्फूर्तिपेक्षां मेहनतीचाच भाग जास्त असतो असा माझा स्वत:चा अनुभव आहे. आतां, इतक्या वर्षांच्या संवयीनें मला वृत्तबद्ध लेखन करणें हें अतिशय सोपें वाटतें. पण स्फूर्तीची मला आतां केव्हांही आवश्यकता भासत नाहीं. कल्पनेची बैठक तयार असली म्हणजे वाटेल त्या वेळीं व वाटेल त्या मनःस्थितींत सामान्यतः वाचनीय अशा तऱ्हेचें काव्य मी करूं शकतों.

माझी बहुतेक सर्व कविता त्रुटित व भावदर्शी आहे. खंडकाव्यें लिहि-ण्याचा माझा विचार होता व त्यासाठीं मी कथाभागही निवडून काढले होते; तथापि, ही माझी आकांक्षा अद्यापिही मला पुरी करतां आली नाहीं. विशिष्ट प्रसंगाच्या किंवा परिस्थितीच्या अनुरोधानें माझ्या मनांत वेळो-वेळीं जे विचार व ज्या भावना उद्‌भुत झाल्या त्या प्रकट करण्यासाठींच मला काव्याचा आश्रय घ्यावा लागला. जनतेला मला कांहीं संदेश सांगा-वयाचा आहे व उपदेश करावयाचा आहे अशी भ्रामक कल्पना ओझरती देखील माझ्या मनाला केव्हांही शिवली नाहीं. वृत्ताच्या बाबतींत मात्र मी पुष्कळसा जुनाट व मागसलेला आहे असें मला वाटतें. गेय चालीचा अव-लंब मी फार करून माझ्या काव्यांत केलेला नाहीं, हा आजच्या काव्य-गायनाच्या काळांत माझ्या काव्यांतील एक मोठा दोषच आहे असें मी समजतों.

मी जेव्हां कविता लिहिण्यास सुरवात केली त्यावेळीं मला इतर प्रसिद्ध कवींनीं लिहिलेल्या कवितांपैकीं पुष्कळशी कविता बिलकूल समजत नसे. हा कदाचित् माझ्या मंदबुद्धिचा परिणाम असेल; पण ही माझी खरीखुरी अड-चण होती एवढें मात्र मी प्रामाणिकपणें सांगूं शकेन. आणि अजून देखील कित्येक कवितांचा अर्थ मला खरोखरच समजत नाहीं. त्यामुळें डोक्याला कित्येक वेळा फारच त्रास होतो. म्हणून आपल्या कवितांचा अर्थ तरी

वाचकांना निदान स्पष्टपणें कळावा यासाठीं मी अतोनात काळजी घेत असे व असतो. माझ्या कवितांत इतर कोणतेही गुण कोणाला आढळले नाहींत तरी ती सोपी आहे, सुलभ आहे, तिचा अर्थ वाचल्यावर चटकन् लक्षांत येतो, असें जर मला कोणी सांगितलें तर मला अतिशयच आनंद होईल. माझ्या मतें सुगमता हा चांगल्या काव्यांतला अत्यंत आवश्यक गुण आहे. शब्दरचना करतांना ती सामान्य वाचकांच्या आटोक्यांत आहे किंवा नाहीं याचा मीं बारकाईनें विचार करतों. त्याप्रमाणें प्रत्येक कवितेंत एक तरी नवीन कल्पना—निदान एक तरी नवीन शब्द यावा याबद्दल मी नेहमीं दक्ष असतों. भाषेच्या बाबतींत बालकवि व कल्पनेची मांडणी करतांना गडकरी मी आदर्शभूत मानीत असतों.

माझ्या या संग्रहांतील कवितेंत प्रेमकाव्यांचा भरणा पुष्कळसा आहे हें या पुस्तकांची पानें वरवर चाळणाराच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे. यावरून मी त्या काळीं कोणा तरी सुंदरीच्या प्रेमपाशांत सांपडलों होतों किंवा कुठल्यातरी रमणीच्या विरहानें 'जळावेगळ्या मासळी'प्रमाणें तडफडत होतों असा जर कयास कोणी काढला तर तो मात्र बरोबर होणार नाहीं. असला कांहीं प्रकार त्यावेळीं घडला असतां तर त्याचा वाचकापुढें प्रामाणिकपणें कबुलीजबाब देण्याइतकें धाष्टर्य माझ्याजवळ आहे हें माझ्या स्वभावाशीं परिचित असलेला कोणीही माणूस सांगूं शकेल.

कोणाही व्यक्तीच्या प्रेमाचें पुष्टीपत्र घेऊन हीं प्रेमकाव्यें मी लिहिलेलीं नाहींत. मला वाटतें कीं, तरुण मनाला जगांतलीं सारीं सौन्दर्यें रमणीरूपानें प्रतीत होत असतात. सौन्दर्याच्या प्राप्तीचा जिवाला लागलेला अष्टौप्रहर हव्यास हें त्याचें प्रेमवेड, सौन्दर्य दर्शनासाठीं त्याचा चाललेला उत्कट निदिध्यास हीच त्याची प्रियाराधना, तें मिळण्याची निराशा झाली किंवा क्षणभर दृष्टिआड झालें तर जिवाची होणारी तडफड हीच त्याची यातनामय विरहव्यथा व या दुःसाध्य आणि दुष्प्राप्य सौन्दर्यदेवतेची मानसपूजा करतांना तिच्या पायावर वेळोवेळीं वहावी लागणारी फुलें हीच तीं प्रेमकाव्यें. हेंच माझ्या प्रेमगीतांचें खरें स्पष्टी-

करण आहे. आणि या दृष्टीनें जर वाचकांनीं त्यांच्याकडे पाहिलें तरच ती त्यांना सहजपणें समजण्यासारखीं आहेत. कवींच्या प्रेमकाव्यांतील कांहीं शब्दांना वैयक्तिक संदर्भाचें किंवा अर्थाचें पाठभेद लावून पहातां येणें शक्य आहे. तथापि, एकाच शब्दांतून अगर ओळींतून अनेक अर्थ काढून दाखविण्याच्या पंडिती कौशल्याच्या कसरती क्षणभर दृष्टी दिपवूं शकल्या तरी त्यांतील कृत्रिमताही त्याच क्षणीं असह्य झाल्याशिवाय रहात नाहीं.

कवित्वशक्तीची झार व तल्लखपणा वाढत्या वयाबरोबर कमी होतो व त्यामुळें पुढें पुढें काव्यनिर्मिती करणें हें जरी शक्य असलें तरी तिच्यासंबंधीं फारशी आस्था व उत्साह वाटत नाहीं. काव्याचा फुलोरा तारुण्याच्या ऐन उमेदींत फुलतो. कालांतरानें कल्पनेच्या मोहक पाकळ्यांचा पसारा आपोआप गळून खालीं पडतो व आंतमध्यें विचाराचीं आटोपशीर फळें तयार होऊन बसलेलीं दृष्टीस पडतात. व मग फुलांचा सुगंध हुंगण्यापेक्षां फळांतील रसाचा आस्वाद घेण्याकडे मनाचा कल वळतो. प्रासांचें पैंजण पायांत घालून वृत्तांच्या तारेवर तोल संभाळून नाच करणें हें प्रतिभेला कांहीं विशिष्ट अवस्थेंतच शक्य असतें आणि त्याच वेळीं तें तिला साजून दिसतें. पद्य हें विचार व भावना प्रकटीकरणाचें एक मर्यादित साधन आहे ही जाणीव एकदां मनांत आली म्हणजे काव्यावरून मन उडतें. तसाच प्रकार थोडासा माझ्या बाबतींत झाला आहे; म्हणून यापुढें माझ्या हातून काव्यस्वरूपाचें लेखन फारसें होईल असें मला वाटत नाहीं. तसें होण्याला आणखी एक दुसरें महत्वाचें कारण आहे. आणि तें म्हणजे कवितेंत मला आतां खरेपणा वाटत नाहीं. जें मनाला पटत नाहीं तें आपल्याला काव्यांत कित्येकदां लिहावें लागतें, ही जाणीव कविता लिहितांना माझ्या मनाला एकसारखी टोचते. शिवाय, काव्यांत विचारप्रकटीकरणाचे ठराविक संकेत वापरणें अगदीं अपरिहार्य होऊन बसलें आहे. बाह्यजगांत बैलगाडीपासून विमानापर्यंत व चकमकीपासून तों विजेच्या बत्तीपर्यंत प्रगति झाली आहे, तरी काव्याच्या सृष्टींत चंद्र, चांदण्या, चातक व चकोर ही सौंदर्याचीं मिरासदार मंडळी आपापलीं वतनें अद्यापही

संभाळून आहेत. कवितेच्या दुनियेंत बुलबुल व चंडोल याखेरीज दुसरे पक्षी उरले नाहींत व गुलाब आणि कमळें याखेरीज दुसरीं फुलेंहीं उमलू शकत नाहींत. आभाळांत मेघ असो अगर नसो चातक मंडळी मात्र आपल्या चोंची एकसारख्या उघडून बसलेली आहेत. असल्या तऱ्हेच्या अत्यंत मर्यादित स्वरूपाच्या प्राणिशास्त्रांत व वनस्पतिशास्त्रांत जोपर्यंत मराठी कविता अडकून बसली आहे तोपर्यंत तिच्याबद्दल विचारप्रवण मनाला फारशी आपुलकी वाटणें शक्य नाहीं. झाडावर ओरडणाऱ्या कोकिळेपेक्षां पोटांत कोकलणाऱ्या कावळ्यावर आज काव्य लिहिण्याची पाळी आली आहे. रात्रीच्या अंधारांत कुंपणावर चमकणाऱ्या काजव्यावर कविता करण्यापेक्षां दिवसाढवळ्या डोळ्यापुढें चमकणाऱ्या काजव्यावर काव्य लिहिणें हें अधिक आवश्यक झालें आहे. आजच्या समाजाचें जीवन, त्याच्या धडपडी, त्याची दुःखें, त्याच्या आकांक्षा ज्यांत जिवंतपणें व्यक्त करतां येईल तें खरें काव्य व तें ज्या साधनांनीं उत्कृष्ट तऱ्हेनें व्यक्त करतां येईल तेच काव्याचें तंत्र. या माझ्या नवीन दृष्टिकोनाला पटणारें काव्य जोपर्यंत मला स्वतःला निर्माण करतां येणार नाहीं तोपर्यंत मी कविता लिहिण्याच्या भानगडींत पडणार नाहीं आणि तें च पडलेलेंच बरें. तोंपर्यंत दुसऱ्यांच्या तद्विषयक सुंदर कविता वाचून मनाची तळमळ निववणें एवढाच माझा आवडता व्यवसाय आहे. असो.

तारुण्याच्या मनोहर स्वप्नसृष्टींत हिंडतांना जो पुष्पसंभार मी गोळा करून ठेवला होता, तो वाळून आतां निर्माल्यवत् झाला असला तरी ओंजळींत एकत्र घेऊन तो हुंगतांना गतायुष्यांतील कित्येक गोड आठवणी जागृत होऊन त्यांचा सुवास वाळलेल्या बकुळीच्या फुलाप्रमाणें मला अतिशयच मनोहर वाटत आहे. इतरांना तो तितका वाटणें शक्य नाहीं. आणि त्याला कोण काय करणार ?

सारस्वत कॉलनी,
पुणें.

प्रल्हाद केशव अत्रे

---

# चिरविरह

स्वर्गींची हंसते जरी तुजवरी ही चंद्रिका सागरा,
उत्कंठा अनिवार दाटुनि उरीं होशी तरी घाबरा;
वर्षाया स्मितकौमुदी मजवरी चंद्रानना ती न रे,
चित्तीं व्याकुळ मी किती मग तिच्या होऊं वियोगें बरें ?

पानाआड दडे तुझी प्रियतमा ती चक्रवाका, जरा—
टाहो फोडुनि धायधाय रडशी तूं तो वियोगातुरा !
काळाची मुख वासुनी पसरली आम्हांमध्यें ही दरी,
अश्रूंच्या प्रळयांत कां न बुडवूं सर्वस्व मी हें तरी ?

ठेवी सूर्यप्रभा हताश जगता नक्षत्रमाला जरी,
कंठी एकच रात्र तें तिजविना जीवन्मृताचेपरी !
प्रेमाचें स्मृतिचिन्ह–शेष अथवा, कांहीं न मागें उरे !
रात्रीमागुनि रात्रि या मग कशा कंठूं तरी मी बरें ?

कल्पान्तीं ग्रहगोल कल्पविरही सारे तरी भेटती
कल्पान्तींहि परी दिसेल मजला ती काय लीलावती ?

---

# मानवी अपूर्णता–

सारंगीची साथ लागते आम्हां गाणें गाया
सौंदर्याला साज लागतो सोन्याचा नटवाया !

चित्रकलेचा उठाव खुलतो असतां मागें छाया,
प्रेमाचें पावित्र्य आमुच्या मंत्रावांचुनि वाया !

मूर्तीचा आधार पाहिजे आम्हां ईश भजाया,
ओळख आम्हां पटते, असतां वर नांवाची माया.

नांगरल्याविण मळयांत आम्हां पीक न ये पेराया,
फूल तोडिल्याविना न त्याचा सुगंध ये हुंगाया.

छिद्र पाडिल्याविना न मौक्तिक येती हातीं घ्याया,
कांति हिऱ्याची खुलवायास्तव लागे कोंदणकाया.

प्रासावाचुनि बोल मनोहर फोल तुझे कविराया,
रसिकावांचुनि तशी तुझी ही पोपटपंची वाया !

---

# आकाशस्तोत्र

जय ! जय ! जय ! हे विराट विश्वमंदिरा !

स्थिरचर अव्यक्तव्यक्त,
उच्चनीच अणुअनंत,
विश्वाचा हा अफाट,
झांकिशी पसारा ! १

जगतीं त्राता न ज्यास,
संसारीं ज्या न पास,
हीनदीन जे हताश,
त्यास तूंच थारा ! २

मायेचा ज्या न मित्र,
ज्या न जगीं अन्नवस्त्र,
प्रेमाचें ज्या न छत्र,
त्यास तूं निवारा ! ३

मोहक हें जग वरुनी,
नजर भुले त्यास बघुनि,
उसळे मग स्वार्थ मनीं,
हीं ' धन–सुत–दारा ' ! ४

विश्व एक भासतसे,
चोंहिकडे प्रेम दिसे,
बघतां तुज लोपतसे,
भिन्नभाव सारा ! ५

चंचलता जगतांतिल,
करि मनास चिंताकुल;
परि तें तुज बघुनि अचल;
निवतसे गभीरा ! ६

क्षुद्रभाव नष्ट करुनि,
भावना उदात्त मनीं,
उपजविशी दाखवुनी,
निज भव्याकारा ! ७

मनुज-कल्पनेस स्वैर,
हृदयीं देउनि अवसर,
जगतापासून दूर,
फिरविसी भरारा ! ८

तुजलागीं होइ बघुन,
स्वातंत्र्योत्कंठित मन;
कीं द्यावें झिडकारून,
या ऐहिक गारा ! ९

मारुन जगतास लाथ,
तोडुनि संसारगांठ,
हिंडावें कीं तुझ्यांत,
करित चिरविहारा ! १०

जें अद्भुत—जें अफाट,
एकवटे तें तुझ्यांत,
रचना ही तव अद्भुत,
गुंगवी विचारा ! ११

ग्रहबाळें स्वच्छंदी,
भ्रमतां चुकतील कधीं,
विश्वजनक म्हणुनि बांधि,
या कारागारा? १२

ब्रह्मांडा जो प्रसवित,
ब्रह्मविहंगम विराट,
त्यावरि कीं तो पसरित,
नील हा पिसारा? १३

धाडुनिया जगिं प्रकाश,
देसी पुष्पां विकास,
नक्षत्रें फुलवितोस,
पसरुनि अंधारा! १४

पाडुनिया तेज प्रखर,
करिसी विश्रांत कहर,
शांतविशी त्यानंतर,
वर्षुनि जलधारा! १५

खेळविशी रविकिरणा,
तैशी शीतळ जोत्स्ना,
वागविशी हृदयिं पुन्हा,
निबिड अंधकारा! १६

मेघ तुझ्या मनिं अघोर,
तांडव करितात थोर,
करिती कधिं हास्यमधुर,
स्वर्गीच्या तारा! १७

जाळितोस जग सांडुन,
परम प्रखर विद्युत्कण,
कधिं तयास थिजविसि पण,
वर्षुनिया गारा ! १८

हास्य कधीं मधुर करुनि,
वाढविसी प्रेम जनीं,
रौद्र कधीं रूप धरुनि,
दाविशी दरारा ! १९

शून्याचें विश्व करुन,
फुलवुनि क्षण, त्यास फिरुन-
करिसी शून्यीं विलीन,
दिव्य जादुगारा ! २०

उठती ओठांत* शब्द,
देसी त्या तूंच नाद,
हृदयींचे भाव मुग्ध,
तूंच खुलविणारा ! २१

मनुजाच्या हृदयांतरिं,
बीजें जीं स्फुरणारी
अमर करिसि तीं सारीं,
देउनि आकारा ! २२

---

* शब्दगुणमाकाशम्—तर्कसंग्रह.

स्वर्गाच्या आधारा,
दिव्याच्या भांडारा,
तेजाच्या माहेरा,
जय विश्वागारा ! २३

फुलविसि जीं मम मनांत,
शब्दफुलें तीं तुझ्यांत,
उधळुनि सानंद करित,
तव जयजयकारा ! २४

---

# फत्तर आणि फुलें

होता डोंगरपायथ्यास पडला धोंडा भला थोरला;
वर्षें कैकहि लोटलीं तरि न तो हाले मुळीं आपुला !

आनंदी फुलवेल एक जवळी होती सुखें राहत;
बाळें सांजसकाळ हांसत तिचीं तैशींच कोमेजत !

थट्टेखोर फुलें हंसूनि वदलीं धोंड्यास तीं एकदां;
" धोंडा केवळ तूं ! अरे, न जगतीं कांहीं तुझा फायदा ! "

संतापून तयास फत्तर म्हणे " कां हीं वृथा बोलणीं ?
सारी सुंदरता इथेंच तुमची जाईल रे वाळुनी ! "

धोंड्याच्या परि काळजास भिडले ते शब्द जाऊनियां;
काळाठिक्कर यामुळें हळुहळू तो लागला व्हावया.

पुष्पांच्या कवळ्या मनांतहि सले तें फत्तराचें वच;
गेली तोंडकळा सुकून, पडलीं तीं पांढरी फारच !

कोणी त्या स्थळिं शिल्पकार मग तों ये हिंडतां हिंडतां,
त्याच्या स्फूर्तिस फत्तरांत दिसली कांहींतरी दिव्यता;

त्याची दिव्यकलाकरांगुलि न जों त्या फत्तरा लागली,
श्रीसौंदर्यमनोरमा प्रगटुनी साक्षात् उभी राहिली !

वेडा पीर असाच गुंगत कुणी एकाकि ये त्या स्थळा,
तीं मूर्ती बघतांच तो तर खुळा नाचावया लागला !

त्यानें तीं खुडुनी फुलें भरभरा पायीं तिच्या वाहिलीं,
तों, त्यांची फुलुनी कळी खदखदां सारीं हसूं लागलीं !

*　　*　　*　　*

लावण्याकृति ती वनांत अजुनी आहे उभी हांसत,
पुष्पेंही बसलींत तीं बिलगुनी पायीं तिच्या खेळत !

---

# उत्कंठा

एक पळाचा विलंब आतां–हृदयाच्या उडतिल चिंध्या !
चल ओठाला ओठ भिडवुनी शांतवि जीवाला वेड्या ! १

स्वर्गसृष्टिला भेटायाला दोनच बोटांचा अवधी,
असह्य वाटे विरह क्षणाचा – धीर न आतां मुळिं अगदीं ! २

दिनरजनीच्या हृदयामधला संध्यापट हा मखमाली—
दूर होउनी बघ, त्या विरही जीवांची जुळणी झाली. ३

दिवसभरी भटकुनी परतली प्रणयी चंद्राची स्वारी,
रोमहर्षिता होउनि आतां गगनश्री त्या स्वीकारी ! ४

दीन होउनी असाच आलों मी प्रीतीचा माधुकरी,
गरिब भिकारी येता दारीं कोण परतवी माघारीं ? ५

उघड गडे तव भुजलतिकेचा नाजुक मिटला दरवाजा,
हृदयाच्या स्वर्गांत शिरूं दे तुझ्या जिवाचा हा राजा. ६

प्रीतिसुखाच्या आशेस्तव तव जगलों मी गे आजवरी,
नैराश्याचें जहर पाजितां पुण्य मिळविशी काय तरी ! ७

प्रीतीची समशेर खुपसुनी मजसि हवे तर ठार करी,
तळमळणारा परि हतभागी हा न तहानेला मारी. ८

हृदयाच्या घरट्यांत तडफडे प्रीतीचें पाखरूं पिसें,
आंत उरावर धडक्या मारी सांग आंवरू त्यास कसें ! ९

खोल हृदय तर उडी घेउं दे, धीर नसे मत्प्रेमाला,
तार मार मग नसे काळजी, तीर एकदां हा सुटला ! १०

# ' होय ' म्हणतांना—

" आतां लाजुनि मान कां वळविशी—संकोच कां हा बरें ?
कां गालावरचे गुलाब हंसरे होती फिकेपांढरे ?

नेत्रांचीं कमळें निळीं फिरकतीं कीं झांकिती पापण्या ?
खालीं कां बघसी – न धीर तुजला होई वरी पाहण्या ?

एकाकी बिचकून कां फिरविसी डोळे सशासारखे ?
कां रोमांच मधून हे थरकती देहांतुनी सारखे ?

घेसी चोरुनि अंग, कां झुकविसी बाजूस खांदा जरा ?
आतां ओझरतां पुन्हां भिडविशी अंगास कां कोंपरा ?

श्वासांचा थरकांप खालवर कां चाले उरीं घाबऱ्या ?
ओलाचिंब रुमाल कां चुरडसी हातांमध्यें कांपऱ्या ?

आलें हृद्गत जें मुखांत अगदीं – तें एकदां बोलना,
सायंतारक तो पहा खुणवितो जाळींतुनी आपणा ! "

ओल्या गुल्छबुचा अहा, तुटुनिया तों कोसळे ताटवा—
आतां शब्द नकोत–गोड कसला अंगीं भरे गारवा !

---

# प्रेमाचें ऐक्य

घाली गुंजनगीत गात भंवतीं रुंजी जरी भृंग हा,
प्रेमानें हंसते तरी कमळिणी सूर्याकडे ही पहा !

आणी जीवन सागरास सरिता प्रेमें जरी वाहुनी,
त्याचें लक्ष्य तिच्याकडे न; झुरतो तो चंद्रिका पाहुनी !

रानोमाळ किती झरे झरझरा वाहोनि हे चालले,
येथें चातक मात्र हा तडफडे; पाणी न त्याला मिळे !

रूपाची पिवळीच पात नुसती ही कोवळी केतकी,
प्रेमें नाग तिचा सदैव विळखा घाली परी घातकी !

वस्तूंचे असतां विलक्षण असें वैचित्र्य विश्वांतरी,
जीवाची क्षणमात्र एकमुखता होणार कैशीतरी ?

एकाचें दुसऱ्यावरी मन; परी अन्यत्र त्याचें बसे,
ज्याचें त्या न मिळे, कुणास मिळतें जें त्या नकोसे असे.

प्रेमाची असतां अशी विषमता विश्वांत चौंहीकडे,
जीवाचें आपुल्याच ऐक्य जुळलें; धन्यत्व हें केवढें !

---

# रानफुली

( एक वेल )

रानफुली तूं रानफुली, आनंदाची सदाफुली !
झुळझुळत्या ओढ्याकाठीं, गवताची हिरव्या दाटीं.

रानफुलें हीं इवलालीं, चोंहिकडे सुंदर फुललीं
सभोंवार हे पानमळे, एकजात लागुनि गेले !

चाफ्याचीं पिवळीं रानें, जाइजुईचीं तशी बनें !
ही इकडे पर्वतराई, टवटवीत हिरवी हिरवी.

अशा रम्य या वनस्थळीं, स्वर्गाची समता आली !
ध्यान लुब्ध देवता इथें, असती तूं गमतें मातें !

२

—रुपानें काळीसाळी, हृदयाची साधी भोळी !
गुणवंती राजस बाळी, विनयाची केवळ पुतळी !

साधी पण सुंदर बाळें; गोजिरवाणी तुझी फुलें !
सदा तयांचा तुला लळा, जीव तुझा त्यांवर सगळा.

प्रसन्नतेची तुझ्या कळी–दिसते अक्षय फुललेली !
प्रेम इथें सारें दाटे ! स्वर्ग इथें साक्षात् भेटे !

कोठुनि अमुच्या संसारीं, मिळेल शांती अशी खरी ?
वणवणतां पोटासाठीं, सौख्याची होते माती !

३

' जंगलांत वाऱ्यावाणी, बागडते अल्लड हरिणी ! '
' रानपाखरूं गात करी, वाऱ्यावरची मुशाफरी. '

' आकाशाच्या मैदानीं, खेळे ती ताराराणी ! '
रम्य अशीं दृश्यें बघणें, हेंच तुझ्या नशिबीं लेणें !

या जगताच्या बाजारीं, कृत्रिमतेच्या घरदारीं
खोट्याचा चाले सौदा, जन त्या वरती सदा फिदा !

सांग कोठुनी मग असलीं, सौंदर्यानें लवथवलीं,
चित्रें आम्हांला दिसणें ? धिग् धिग् अमुचें जगीं जिणें !

४

फूलपाखरूं रानकवी, जरि न तुला गाणीं गाई,
कुणी तुजकडे क्षणभरही, प्रेमभरें पाहत नाहीं !

जग न गुणांचें रसिक तरी, हीच यांतली खुबी खरी !
रूपाच्या भपक्यावरती, कोणीही भुलतो जगतीं !

दिसतो साधेपणांत ना, एकहि गुण या जगीं कुणा !
रूपाचा नखरा नकली, कसा न ठाउक तुला मुलीं !

भरेल साधेंपण कसलें, मग अमुच्या नयनीं असले ?

५

प्रेम कुणाचें नसे खरें, तुजवरतीं तर नसो बरें !
जग प्रीतीचें स्मशान हें, रात्रंदिन जळतें आहे !

स्वार्थीच्या सरणावरतीं, प्रीतीचीं प्रेतें जळतीं !
अशा जगाचें प्रेम तुला, कधीं न येवो नशिबाला !

कारण तूं पावित्र्यखनी, मंगल दिव्याची करणी !
जड़ताचा संबंध तुला, बरा कदापि न आलेला !

— आणि गडे माझी कविता, गुंगुनि गेली तुज बघतां
प्रेम तिचें तुजवरि असतां, असें कशाची कमतरता ?

६

डोल गडे तर डोल सदा, खळ न पडो तव आनंदा !
नित्य अशीं हृदयीं धरुनी, फुलें तुझीं हीं दिव्यगुणी !

रम्यपणा त्यांचा बघतां, उचंबळे हृदयीं कविता !
स्पर्श न त्यातें करो कुणी, नच घेवो किंवा खुडुनी;

केव्हातरि तीं हंसहंसुनी, अनंतांत जातिल विरुनी !
सुवास त्यांचा मम कवनीं, राहिल परि अक्षय भरुनी !

---

# एका कविमित्रास—

भक्तीची फुलबाग जी बहरली या पुण्यभूमीवरी,
काळाच्या वणव्यांत ती करपुनी उध्वस्त झाली जरी;
भाग्याचें परि बीज एक चुकुनी गेलें कसें राहुनी ?
त्याचें सुंदर रोप हें उगवलें वाग्देविच्या अंगणीं !

रंगाच्या नटव्या छटा विलसती याच्या न पुष्पांवरी,
किंवा त्यांत सुगंध ना दरवळे उन्मादकारी जरी;
भृंगांचे लहरी थवे न कधिंही झेंपावती यावरी,
चित्ताकर्षक त्यावरी झळकतें पावित्र्य कांहीं तरी !

श्रद्धागंध चहूंकडे उधळिती याच्या सदा पाकळ्या
प्रीतीचा मकरंद आणि झरतो याच्या उरीं कोवळ्या;
संसारतापदग्ध जीव जगता जाई यदा त्रासुन
तेव्हां गंध तुझाच सेवुनि मिळे आशेस संजीवन !

एकान्तीं विमनस्कतेंत अगदीं जेव्हां कधीं बैसतों,
तेव्हां त्वत्सुमनें करीं धरुनिया सानंद मी हुंगितों.

# भावना आणि जीवन

तीर घुसुनि पंखांत, ऊर बंबाळ जाहला जरी,
जखमी जीवन तरी पांखरूं कंठी वाऱ्यावरी ! १

गोता बसुनी तुटला दोरा पलटी खाई तरी,
गिरक्या मारित पतंग हिंडे अधांतरीं भिरिभिरी. २

पिचला पावा गळ्यांत, गेली ओघळुनी माधुरी,
दीड वितीचा देह लांकडी तरी जगे बेसुरी. ३

तुटले नाडे दोर–फाटलें शीड, सुकाणूं सुटे,
तुफान लाटावरी नाचतें तारूं तरि एकटें ! ४

झडे पालवी, गळे फुलोरा, वठल्या फांद्या तरी,
वर्षोवर्षे खोड ताठचे ताठच जागेवरी ५

ओघ उन्हाळुनि झरा आटला थेंबटिपुस ना उरे,
तसेंच उघड्या माळावरतीं पात्र कोरडें फिरे. ६

पिढ्यापिढ्याच्या संसाराची राख जाहली जरी,
गृहलक्ष्मी तरि काळ कंठिते पडक्या भिंतीवरी ! ७

निष्ठुर बाला जीव तुडवुनी पायदळीं जाय ती
पाकपाकळ्या तुटून पडल्या देंठापुनि खालतीं. ८

वाऱ्यावरतीं उडून गेला सुगंध मैलागिरी,
पराग वाळुनि, जीवन झालें निर्माल्याचे परी ! ९

तरी कशाला दुर्दैवा, हें विनाभावना जिणें ?
धन्य खरोखर मरण, जरी तें अशा क्षणीं लाभणें १०

---

# प्रिया व कांहीं वस्तू—

परिसा, करिसी निजस्पर्शानें लोखंडाचें सोनें,
तुच्छ वाटतें सुवर्ण परि तें करितां स्पर्श प्रियेनें !

कल्पतरूच्या तळीं पुरतसे इच्छा मनिंची सगळी,
पायतळीं पण हिच्या बैसतां इच्छा उरते न मुळीं !

लाभतसे अमरत्व प्राशिता अमृतजल स्वर्गिंचे,
अधरामृत चाखतां हिचे पण भय न उरे मरणाचें !

हवा कशाला मग वस्तूंचा या नसता हव्यास ?
धरितो " केशवकुमार " म्हणुनी एक प्रियेचा ध्यास !

---

# मार्गप्रतीक्षा —

संध्येची गहिरी शराब भरुनी अस्मान प्याल्यामधें,
   आतां हांसत येत नीलवसना रात्रीं जगन्मोहिनी;
विश्रांतीस्तव विश्वही परतलें आतां घरालागुनी
   अंगीं शीण भरोनि निश्चळ बसे निद्रेविना आपुडें !

काळ्याशार वनावरी पसरली केव्हांच निःस्तब्धता,
   ओढ्याचीं कुरणांतुनी हळुंहळूं मंदावलीं पावलें;
मैदानामधुनी उजाड पण या वारा परी एकटा
   कां माझ्यासम उन्मनस्क भटके वेड्यापरी नाकळे !

प्राजक्तावरचा बहार निथळे केव्हांपुनी अंगणीं,
   खालीं सांडुनिया सडा दरवळे; वेंचावया ना कुणी !
टाकी बाजुस बैसुनी गुलछबू निश्वास हा सारखा,
   गंधानें भरवी दिशा; तळमळे चित्तीं वियोगेंच कां ?

आतां उंबरठ्यावरी बसुनिया पाहूं किती वाट मी ?
   गेला ताटकळून जीव अगदीं आला गळा दाटुनी !

---

# प्रीतीची फेड

प्रीतीच्या हंसऱ्या कळ्या उमलल्या ज्या गे तुझ्या अंतरीं,
त्यांची माळ सुरेखशी रचुनियां त्वां अर्पिली मत्करीं;
तूझा हा उपकार गोड सखये, फेडूं तरी मी कसा ?
देऊं काय तरी तुला परत मी – मी हा भिकारी असा !

ठेऊं काय गुलाबफूल आणुनी रानांतले त्वच्छिरीं ?
स्वर्गींचे हंसती गुलाब परि गे गालीं तुझ्या सुंदरी !
चाफ्याची पिवळी कळी जरि तुझ्या खोंप्यात खोंवू तरी,
आहे शोभत त्याहुनी परि कळी ही नासिकेची बरी.

ओंठाच्या सम लाल काय असतीं तीं कर्दळीची फुलें ?
जाईच्या कलिका तशाच हंसतीं त्यांच्यासवें प्रेमले,
सृष्टीची फुलदेवताच असशी तूं माधवीची सखी,
माझ्या योग्य न पाकळ्या मलिन या ठेवावया मस्तकीं !

गाऊं कां अथवा तुझ्यावर नवीं गाणीं अहां गुंफुनी ?
मुग्धे, रम्य निसर्गगान परि तूं जें घोळतें मन्मनीं !
नाहीं या हृदयाविना मग तुला देण्यास आतां दुजें,
देऊं तें तरि कां तुला ? परि असे तें सर्वथा गे तुझें !

नाहीं मी जरि फेडिले ऋण तुझें मी दीन आहे तरी,
राहो हा उपकार भार सखये, आजन्म माझ्यावरी.

---

# चुंबन

जाईमोगरिच्या कळ्या उमलल्या ओच्यांत घेऊन ती,
बैसे गुंफित पुष्पमाळ तुळशीवृंदावनामागुती !
सारा खेळ अडे परंतु इकडे माझा तिच्यावांचुनी,
आलों त्या स्थळिं शेवटीं चहुंकडे आधीं तिला धुंडुनी !

कौशल्यें रचण्यांत माळ इतुकी वृत्ती तिची रंगली,
सोन्याची पुतळीच रेखिव कुणी कीं मांडुनी ठेविली !
जावोनी हलकेंच मागुनि तिच्या मी चोरट्या पाऊलीं
नेत्रांची दळदार नीळकमळें झांकोनिया टाकिलीं !

"ताई – छे, चिमणी – बने, झडकरी बोला असे कोण तें ?
हो – हो, ओळखलें तुम्हांस पुरते आहांत तुम्हीच ते !
आतां ओळखलें तरी अजुनि कां हे हात डोळ्यावरी ?
साऱ्या जातिल या कळ्या चुरडुनी, व्हा दूर ना लौकरी !"

"जाऊं दे चुरडून त्या ! तुज पुन्हां देईन मी आणुनी,
घेऊं दे पण एक साखरकळी ही एवढी तोडुनी !"
"थट्टा ही भलतीच काय ? मग मी जाते कशी आपुली !—"
ओंठांशीं पण ती कळी भिडवुनी आधींच भ्या हुंगिली !

हाताची निमिषांत तोडुनि अढी मैनावती लाजरी
भुर्कन् जात उडून दृष्टिपुढुनी केव्हांच वाऱ्यावरी !

---

# बकुळीचें फूल

सांग बकुळीच्या लाडक्या फुला,
गंधदेविच्या गोजिऱ्या मुला,
म्लान होतसे जरिहि मुखकळा
वास कां तरी येतसे तुला ? १

गालिंची जरी उतरली छवी
मुखवट्यावरी मुळिं न टवटवी;
पाकळ्यांतुनी तरिहि ना कळे
सारखा कसा गंध दरवळे ? २

बाल्यकाळिंचा बहर कोंवळा
गळुनि खालतीं जरि ही वाळला;
येतसे तरी स्मृतिसुगंध तो
तुजमधें जसा अजुनि खेळतो. ३

कीं अहा ! दया – स्निग्ध उपकृती
जरि कृतज्ञतेआड लोपती;
तरि न त्यांतली जात माधुरी
राहिली तुझ्या जेविं अंतरीं ! ४

जीवनांतलीं प्रेमसाउली
क्षीण जाहली वृद्ध माउली
कळवळा तरी वाहतो उरी
तुजमधें जशी गंधरसझरी. ५

आपदेमुळें वंश जरि वठे
जोमवाढही पार गारठे;
तरि विशुद्धता अंकुरांतली
राहते, जशी अजुनि तव दळीं. ६

शब्दसंपदा जीर्ण जाहली
भावसुलभता जरि ढगाळली;
परि तयांतली काव्यमोहिनी
जातसे तुझ्यासम न लोपुनी. ७

भग्नहृदयिं या प्रीत कोंवळी
हाय, कोमुनी दलित जाहली;
स्मृतिमरंदही त्यांतुनी झरे,
गळतसे जसा तुजमधून रे ! ८

पहिल्या त्याच प्रीतीच्या मधुर स्मरणावरी
वाहतों शुष्क बकुळीचें फूल हें कांपऱ्या करीं !

---

# कळी रुसली !

सुकुमार । चंद्राची नाजुक कोर.
गुलजार । वदनाचा हंसरा नूर.

लखलखती । शुभ्र हिरकण्या अधरपुटीं;
जणुं लपली । नयनिं बाल चंचल बिजली.

कर्दळिचे । शुद्ध कोंवळें पाय जिचे,
रुणझुणतीं । मंजुळ पैंजणे त्याभंवतीं;

मारुतही । केंश जिचे चुंबित जाई,
सुंदरशी । सरल हृदयबालिका अशी.

फुललेला । बाग असा पाही कुठला
मोह पडे । बघतां त्यांतिल फुलझाडें;

तों दिसली । सहज कुठें तिज फुलवेली
त्यावरतीं । कळी एक डोलत होती.

दुडदुड ती । धांवत जाय तिच्या पुढतीं,
मृदुल करीं । खुडुनि तिला स्वकरांत धरी.

कौतुकली । चुंबुनि तिज कितिदां हंसली,
"—सोनुकली । ताई माझी तूंच कळी !

हांस गडे । उघडि वदन हें तव छकुडें,
हांसच ना । उदास मुख तुज शोभत ना !

हाय परी । कलिका ती सुकुनी गेली !
टपटपती । अश्रु तिच्या गालावरतीं.

गंहिवरली । बाला ती सदना आली.
मग बोले । मातेप्रती पुसुनी डोळे,

" बघ आई । कलिका ही बोलत नाहीं.
हिरमुसली । माझ्यावर कां ग रुसली ? "

जननि परी । कुरवाळुनि तिज हृदयिं धरीं,
" वेल्हाळे ! कलिका ही सुकली ! " बोले.

" छे, आई । सुकली न ही रुसली पाही ! "
रुसलि कळी ! म्हणुनि तिनें हृदयीं धरली,

रडरडली । दमुनी मग झोंपीं गेली.

---

# कमळेस—

तारा मावळली तरी झळकते कांती तिची मागुती,
जातां तार तुटोनिही घुमतसे कानीं तिची झंकृति;

स्वर्गस्थे कमळे, तुझें मुख जरी अदृश्य झालें गडे,
मुग्धे, राहिल गोड हास्य तव तें आजन्म डोळ्यापुढें !

---

# तुणतुण्याची तार

ही दुनियेची दिल्प्यार!
तुणतुण्याचि माझ्या तार!

काय ज्वानिची हिच्या बहारी,
लाज नाचते सर्व शरीरीं;
हात न ठरतो मुळीं हिच्यावरि
जणुं नव्या नवतीची नार! १

लावण्याची काय झळाळी
जशी हिऱ्याहुनि प्रभा आगळी,
बघतां बिजली पडेल काळी
नजर ही करितसे ठार! २

चांफेकळिची काय पाकळी
जर्द पात केतकिची पिवळी
लवलवते कीं नागिण गव्हळी,
कीं सोन्याची तलवार! ३

हिचे चालणें मराठमोळी,
वर मोत्याची घाली जाळी,
कसे पिंतांबरि साडीचोळी
करि भर्जरिचा शिणगार, ४

हिची बांधणी नाजुक पातळ
जशी रानची कवळी कर्दळ;
पायीं करिती पैंजण झुळ्मुळ
बोलणें मज गुलजार! ५

ओझरता जों होई स्पर्श न
तोंच उसळती तिच्या मुखांतुन;
सूर मनोहर; कारंजांतुन —
जशी उचंबळे जळधार ! ६

सदा लागला पंचमीं गळा
झरा वाहतो जसा खळखळा
झुरत बसल्या वनीं कोकिळा
अशि हिच्या सुरची झार ! ७

सूर ऐकता हिचा जनानी,
जंगलच्या थांबतात हरिणी;
गुरें विसरतीं चारापाणी
वनिं नाचति मैनामोर ! ८

मंद पडे ओढ्याची झुळझुळ,
वाऱ्याची थांबते धांवपळ;
आनंदानें करिति सळसळ
ही शेतें हिरवीगार ! ९

हिच्या सुराची अशी धडाडी,
ठाणबंद कीं काठेवाडी,
जशी धांवते अबलक घोडी;
बैसतां तिचा वर स्वार ! १०

खडकामधुनी पाझर फोडिल
वठलीं झाडें क्षणीं पालविल;
मातीमधुनी मृतास उठविल
ही अद्भुत जादूगार ! ११

उलगडिते काळजांतिल अढी
सरळ करी ही भुंवइ वांकडी;
सरसावतसे पुढतीं मांडी
परिसतां हिचा झंकार ! १२

हिच्या सुरानें पळते भीती,
तटतटुनी ही फुगते छाती;
अवसानाची उसळे भरती
करी धैर्य मनीं संचार ! १३

नसांनसांतुनि रक्त उसळवी,
दंडावरची बाही सरवी;
मुर्दाडाचा मर्द करी ही
रणधीर वीर झुंजार ! १४

आपलपोटेपणा वितळवी,
कर्तबगारी उरी उपजवी;
माणुसकीला मनीं जागवी
विसरवी पार घरदार ! १५

रुसणें फुगणें ठाऊक नाहीं,
बोला तिजशी कुणी कसेंही,
गुलगुल बोले मैनाबाई
करि दुनियेचा दिल गार ! १६

तुटल्यावरतीं तिला जोडणें
भगवंताविण कुणी न जाणें !
विस्कळल्यावर कसा गुंफणें
हुप्काचा फिरुनी हार ? १७

एक दिलाचें एकच गाणें
एक सुरानें अक्षय गाणें,
यांवाचुनि ती कांहिं न जाणें,
सत्यांत तिचा निर्धार ! १८

ओबडधोबड माझी गाणीं
त्यांत आपुली सुरेल वाणी;
मिसळुनि दुनिया टाक भारुनी
देवि, हा तुझ्यावरि भार ! १९

उदे, उदे, त्रैलोक्यमोहिनी,
तूंच सारजे, विश्वस्वामिनी,
एकनिष्ठ गोंधळी तुझा मी
तुजवीण शून्य संसार ! २०

---

# शेवटचें चुंबन

एकदां बाले । चल चुंबन दे शेवटलें !

आग ओतुनी कां अश्रूंची
करपविशीं गुल्चमन् गालिची ?
राख टबटवी जरा तयाची;
पूस तर डोळे । चल, चुंबन दे शेवटलें !

एकसारखीं हृदयावरतीं
मृत सौख्यांची भुतें नाचतीं;
स्मरणाचे काळजांत खुपती
विषारी भाले । चल, चुंबन दे शेवटलें !

देवुनिया मज चुंबन पहिलें
आजवरी त्वां जगीं जगविलें;
परि क्रमाया जीवन पुढलें
पुन्हां वेल्हाळे । चल, चुंबन दे शेवटलें !

तव अधरींची शराब ओतुनि
विझव आंतली आग मोहिनी;
मत्प्राणाचे टाक भरवुनी
पांचही प्याले । चल, चुंबन दे शेवटलें !

गात्रबंधनें तुटती झरझर,
अंतकाळची वाजे घरघर !
परि ओंठांच्या उंबरठ्यावर
प्राण घोटाळे । चल, चुंबन दे शेवटलें !

पाश तुझा हा मरणा, आवर !
हृदया, धडधड असाच क्षणभर;
घोट घेऊं दे मजला तोंवर —
त्वरा कर बाले । चल, चुंबन दे शेवटलें !

---

# खालीं आणि वर

( दोन चित्रें )

“ लहानपण देगा देवा
   मुंगी साखरेचा रवा !

ऐरावत रत्न थोर
   त्यासि अंकुशाचा मार ! ”

[ १ ]

उंच पाटी पालथी उशाखालीं
हात दोन्हीही आडवे कपाळीं;
फरसबंदीची शेज गार गार
शांत घोरत पसरला वर मजूर. १

मार्गी होता चालला खडखडाट,
आणि लोकांचा रुक्ष गजबजाट;
वरी झगझगता बिजलिचा उजेड
तरी त्याला लागली झोंप गाढ ! २

घाम निढळावर जरी डंवरलेला
अंगिं कुडताही भिजुनि चिंब झाला;
कुशीवरही एवढा तरि वळेना
दीर्घ सुस्कारा मुखांतुनि निघेना ! ३

धूळकचरा खालतीं सांचलेला
तसा थुंक्यांचा सडा सांडलेला;

घाण यावी त्याजला परि कुठून ?
कुठें होतें निद्रेंत त्यास भान ? ४

काम त्याचें संपलें दिवस जातां,
‘ उद्यां ’ची तर त्याजला नसे चिंता;
नसे आतां तो कुणाचा हमाल,
निजे राजासम मोकळा खुशाल ! ५

[ २ ]

सात मजल्याची पलिकडे हवेली,
दीपश्रृंगारें सुबक सजविलेली;
उंच वरतीं सज्जांत सौधभागीं
लाल लक्ष्मीचा पहुडला पलंगीं ! ६

परांची वर मउमऊ बिछाईत,
रेशमाच्या गिरद्याहि लुसलुशीत !
शुभ्र पडदे जाळिचे भोंवतालीं,
झालरीही लोंबती छताखालीं ! ७

भरे वाळ्याचा चहुकडे सुगंध,
जळे शेजारीं शामदान मंद;
फिरे पंखा गरगरा कोंपऱ्यांत,
हवा खेळतसे थंडगार आंत. ८

झोंप येईना तरी बिचाऱ्याला
कां न लागे डोळ्यास मुळीं डोळा ?
कुशीवरतीं वळतसे मधमधून
आणि सोडितसे श्वास तळमळून ! ९

कुठ गुंगी लागते जरा शांत
तोंच दचकुनि तो बसे उठुनि ताठ !
बघे डोळे फाडून भोंवतालीं
दृष्टि मिटुनी मग पडे पुन्हां खालीं ! १०

दिवस टळलेला बरा त्यास वाटे
'उद्यां' स्मरतां परि ऊर आंत फाटे;
जरि असला भोंवतालीं महाल
तरी चिंतेचा आंत तो हमाल ! ११

---

# रानकोकिळेस—

रानकोकिळे, पुरे गडे कां आळविशी अपुलें गाणें,
विषण्ण जीवा पहिल्यावाणी सूर तुझा कसला पटणें ?
ही चैत्राची ऐन बहारी, टवटवलीं सारी रानें,
फुलवेली पालवती; गळतीं झाडांची पिकली पानें !
तूं रानाची राणी, तुझिया गाण्याचा एकच सूर,
रानोरानीं भरुनि राहिला जग झालें त्यांतच चूर !
तळमळणाऱ्या नव्या जिवानां आशेचा देउनि धीर
सूर तुझा गे दूर करिवसे त्यांच्या मनिंची हुरहूर !
आशा नाहीं-प्रेमहि नाहीं परंतु गे ज्याच्या हृदयीं,
सांग तयाला तुझ्या गायनीं गोडी कैशी लागावी ?
तारुण्याचा भर ओसरला; ते सौख्याचे क्षण गेले
नसानसांतुनि नव्या दमाचे रक्त जेधवां सळसळलें !
विचार स्वप्नें अंधुक पाहत बैसत होतो त्यावेळीं
वनराईतिल ओढ्याकाठीं ऐकत तुज सांजसकाळीं !
काळहि गेला, विचार गेले ! वृत्ती आतां पालटली;
आस मनींची पुरली, सरली प्रीतीची ज्वानी पहिली !
रानकोकिळे, उगाच कां मग आळविशी अपुलें गाणें ?
विषण्ण जीवा पहिल्यावाणी सूर तुझा कैसा पटणें ?

---

# प्रेमाची कविता—

वैशाखाच्या ऐन भरांतील ती सायंकाळ,
कारंजावर गुंफित बसली प्राणसखी माळ;

फुलें सुरंगी बागेमधली करुनि सर्व गोळा,
माळ मनोहर रचित बैसली सुगरण वेल्हाळा.

कोमळतेची कळाचातुरी अवलोकित सारी
जीवभाव नजरेंत आणुनी बसलों शेजारी.

सौंदर्याचें चित्र मनोहर तें सखिचें बघतां
स्फूर्तीची हृदयांत अकस्मात् खळाळली सरिता !

ओंठावरती नाचूं लागलें प्रेमाचें गीत;
सहज वाटलें कीं जडवावें शब्दकोंदणांत !

झेलाया बरसात प्रीतिची मग कागद हातीं
बसलों घेउनि परि उमटेना शब्द एक ओठीं.

तुफ़ान भरती जरी जिवाच्या चढली दरियास,
परी आंतल्या आंत विरतसे शब्दांचा फेंस.

प्रीतीच्या भावना उसळती हृदयीं स्वच्छंद
गणमात्रांचे कसें टिकावें मग दुबळे बंध ?

प्रेमाच्या धुंदींत बहिरली हृदयाची चाल
कशी सुचावी सांगा मग त्या कवितेला चाल ?

नाचतसे बेताल जीव हा, दाटुनि ये ऊर;
लावावा मग त्या गाण्याला कसा तालसूर ?

विश्वाला व्यापुनी उरे जी प्रेमाची सृष्टी
कशी बसावी दीड वितीच्या ती तुकड्यावरती ?

जित्या जिभेवर जिरुनि जातसे शब्दाचा जोर
कोठुनि मग निर्जीव लेखणी बोल बोलणार ?

कसें लिहावें—कुठें लिहावें प्रेमाचें गीत,
दंग जाहला जीव सारखा याच विचारांत !

क्षणैक झालों मूढ; सखीनें तों वळवुनि मान
उरीं खोंचला हळूंच हंसऱ्या नजरेचा बाण !

जीव थरारे ! सर्वांगाचा हो साखरकांप
बोटामधुनी गळे लेखणी मग आपोआप !

चुरगाळुनि तात्काळ दिला तो कागद फेकून
आणि घेतली हृदयावरतीं तिज आलिंगून !

दिलादिलाची तार साधतां, एक जुळे सूर;
वाक्सरितेला प्रेमाच्या मग उचंबळे पूर !

क्षणार्धांत मग लिहुन टाकिलें लाल अक्षरांत,
गालावरतीं मुक्यानेंच मी प्रेमाचें गीत !

---

# उत्कंठिता—

आतां सोडुन बोट दे तरि—नको ओढूं मला यापुढें
कोठें आणुनि सोडिलेस मजला या आडरानामध्यें ?
लागे कोरड ही घशास नयना येई वरें भोंवळ
नाहीं पाउल टाकण्यास पुढतीं आतां सख्या रे, बळ !

माझें मी घरदार सोडुनि तसें सारे सगेसोयरे
आले मागुनि पावलांवर तुझ्या पाऊल टाकून रे;
ओलांडून दऱ्या पहाडहि तशीं किर्कोंट काळी वनें
आले येथवरी; कशास गणिले नाहीं तुझ्याकारणें !

प्रेमाचा गळ टोचुनी कुठवरी ही मासळी ओढशी
पाण्यावांचुनि सारखी तडफडे कां हें न तू पाहशी ?
आशा दावुनि दूर ही झुकविली वाऱ्यावरी वावडी
कां आधांतरिं ठेविशी अजुनिया प्रीती तिची भावडी ?

जी विश्वासुनि ठेविली प्रथम मी ही मान खांद्यावरी
ती हातीं सखया तुझ्याच दिधली; कांहीं तियेचें करी !

---

# मनाचें गाणें

[ या गाण्याची चाल कुणाला माहीत नाहीं ! ]

आंतल्या आंत । मन बसे सारखें गात !
रुक्ष जगाचा जरी गलबला
भंवतालीं सारखा चालला,
—दाद तयाची कोठुनि याला ?
स्वस्थ निवांत । मन बसे सारखें गात ! १

हांसत असली पुनव पिठोरी,
करकरली वा अवस भेसुरी,
आग पेटली ग्रीष्माची वरि—
तरी निर्धास्त । मन बसे सारखें गात ! २

गायन याचें शब्दावांचुनि,
नुसती गुणगुण; अर्थ कोठुनी ?
ध्रुवपद बैसे एकच धरुनी !
एक स्वरांत । मन बसे सारखें गात ! ३

सूर वाहतो जो बाहेरी,
त्यावर गाया आरंभ करी,
ताल न ठेका कसलाच धरी !
कोठली साथ ? । मन बसे सारखें गात ! ४

गातां आणी गांभीर्य कधीं,
बालिशता कधिं दावी अगदीं;

गुंग आपुल्या सदैव नादीं !
मुळीं ना शिस्त । मन बसे सारखें गात ! ५

आशा करितां मंजुळ गुंजन
हुरहुरत्या जीवाचें रंजन,
तों किंचाळुनि करि सुखभंजन
बेसूरांत । मन बसे सारखें गात ! ६

नैराश्याच्या रुद्र रागिण्या
आंत टोंचिती घोर पराण्या
रंग तदा ये याच्या गाण्या !
असें हें भूत । मन बसे सारखें गात ! ७

देह गुंतला पोटामागें
रडगाणें तरि याचें लागे !
स्वप्नांतरिही गोष्टी सांगे !
दिवस ना रात । मन बसे सारखें गात ! ८

ब्रह्मानंदीं जीव रंगतां,
भान विसरुनी देह डोलतां,
मधें आळवी रागच भलता !
विघ्नसंतुष्ट । मन बसे सारखें गात ! ९

उठति सूर ते दिव्य अंतरीं,
कोठुनि येती ऐकाया परि ?
थांबवुं म्हटलें क्षणभर या तरि–
करिल आकांत ! । मन बसे सारखें गात ! १०

कानिंकपाळीं, उरीं शरीरीं
भरलें याचें गीत बेसुरी,

विश्वगायनीं नुरे माधुरी !
रुचि न कशांत । मन बसे सारखें गात ! ११

कधीं मनाचीं गाणीं लटकीं
थांबतील हीं तुटकींफुटकीं ?
अहा ! तरिच या येईल लोकीं—
दिव्य संगीत ! । मग नको—नको तें गीत ! १२

---

# मनोरमा

हातीं घेउनि हीं सुवासिक फुलें नाना तऱ्हेचीं किती
दारीं सांग मनोरमे, हंसत तूं आलीस केव्हां तरी ?
सृष्टी नाचतसे प्रसन्नवदना येतां उपासुंदरी,
तैशा त्वत्प्रियदर्शनें नवनव्या आशा मनीं नाचती !

तेजस्वी मधुचंद्रिकेविण दिसे आकाश जैसें सुनें,
किंवा कोकिलकूजनाविण मुकी वासंतिका वाटते;
वेलींचें कुसुमाविना गमतसे सौंदर्य जैसें उणें,
तूं नाहींस तरी दिसेल सदनीं आल्हाद माझ्या कुठें ?

रूढीच्या वणव्यामधें करपल्या येथें लता कोवळ्या
पुष्पांचा हंसरा बहार कुठुनी येईल त्यांना बरें ?
आतां हांसवि शीतल स्मितसुधा शिंपून त्यांच्या कळ्या,
या माळावर नंदनोपम विभा निर्मून दावी त्वरें !

पुष्पांचा रचुनी सुवासिक असा संभार हातामधें
केव्हां सांग मनोरमे, फिरून तूं येशील दारीं गडे ?

---

# डहाळीवरचीं फुलें

सोनचांफ्याच्या डहाळीस उंच
फुलें होतीं लटकलीं चार पांच
आणि हातालगतही जवळ खालीं
फुलें दुसरीं आणखी उमललेलीं ! १

लक्ष शेंड्यावरतींच प्रथम जाई
फुलें बघुनी आनंद जिवा होई.
सहज उपजे अनिवार मनीं आस
करीं घेउनि बैसेन कधीं त्यास ! २

यत्न तोडाया किती तया केलें
फूल हातीं परि एकही न आलें !
मान अवघडली, पाठ भरुनि आली !
परी हाताजवळीं न ये डहाळी ! ३

फुलें टकमक जवळचीं बघत होतीं
जणूं मजला हांसून बोलतीं तीं;
" जवळ असतां आम्हांस सोडुनी कां
धरासि भलत्याचा व्यर्थ मनीं हे का ? " ४

फुलें भोळीं तीं चिमुकलीं अजाण
गूढ त्यांना कळणार हें कुठून ?
सौख्य जीवाला नसे सुलभतेंत;
परी दुर्लभ वस्तुच्या प्रयत्नांत ! ५

फुलांचे ताटवे जरि हे हातालगत लागले,
परंतू वेधिती चित्ता डहाळीवरचीं फुलें !

---

# सारंगीवाला

[ कलेवरील निरपेक्ष प्रेमानें वाजविलेली सारंगी मनास मोहिनी घालते. जीवनाच्या कलहांत तिचा शस्त्रासारखा उपयोग केल्यास कलेसह तिचा नाश होतो. हा अप्रिय अनुभव पुण्याच्या रस्त्यांतून रात्रींच्या वेळीं सारंगीची सुरावट छेडित जाणाऱ्या एका सारंगीवाल्यानें आम्हांस दिला. कांहीं कविमित्रांनीं त्याला उद्देशून रचिलेल्या गौरवपर गाण्यानी आधींच आतुर झालेली रसिकता विरस पावतांच त्या सुरावरच निराशेचें गाणें गाऊं लागावी हें साहजीकच आहे. खालील कडव्यांतून सांप्रदायिक कल्पनेच्या कल्पित माधुरीपेक्षां अनुभवाचा कडवटपणा विशेष आढळेल, पण त्याला इलाज नाहीं. त्यांतही एकप्रकारची रुचि आहेच ! ]

थांबीव एकदां सारंगी ही चल जा, येथुनि दूर !
काम करुनी देह थकला
प्राण अगदीं कंठिं आला
शेजेस पाठ ना कुठें लागली, तोच निघे तव सूर १

गुंगला हा जीव आधीं
गुंतवाया त्यास नादीं
निवडून वेळ तूं अचुक काढिशी दिसशी खूप चतूर ! २

जीवनाची रागदारी
ऐकुनिया ये शिसारी;
या विटल्या कानीं संगीताची आतां कुठुनि जरूर ? ३

कांपऱ्या या घेशि ताना
डोलवीशी आणि माना
दाविशी कराची सहज सफाई, गज चाले चौखूर ! ४

फिरति तारावरुनि बोटें
नाद वरचे वरति उमटे;
वाहतें हृदय त्यांतून कुठें ? तें बिदागीस आतूर ! ५

आग पेटे आंत पोटीं,
शांतता ही वदनिं खोटी.
हे सूर कशाचे ? जळजळीत हा लोहरसाचा पूर ! ६

आंतड्याच्या पिळुनि तारा,
काढिशी या गीतधारा;
ऐकून भयानक राग तयाचा हंसे रात्र भेसूर ! ७

लांकडी हें वाद्य दुबळें
मानवी त्या हेतु न कळे !
ना तरी तडकुनी दुभंग होइल खास तयाचा ऊर ! ८

याचनेचा सूर रडका
त्यास कसला ताल–ठेका ?
धाबऱ्या मनीं उडवितें उलट हें भलभलते काहूर ! ९

हातिं येतां चार तुकडे
टाकसी कां वाद्य उपडें ?
करितोस कलेची पोटासाठीं विटंबना मगरूर ! १०

जे हरीचे लाल ह्रौशी,
जीव हळवे कीं विलासी;
जा तया कुशलता दाव ! तयांचे खिसे खोल भरपूर ११

जीव निद्रेमाजि रंगे,
स्वप्नसृष्टींतून गुंगे;
जा देउं नको क्षणमात्र जगाची तयास जाणिव क्रूर ! १२

## —स

चंद्राची चढती कला झुलविते पृथ्वीवरी सागरा,
        नाचे हर्षभरें मयूर बघुनी मेघावळी धूसरा;
स्वर्गींच्या जलदेवतेस्तव तृषा लागे सदा चातका,
        बैसे लावुनि ध्यान पर्वत तसा स्वर्भूकडे सारखा.

कोठें कोण? परस्परांत कसला संबंध जेथें नसे,
        किंवा इच्छितलाभ होईल अशी आशा न ज्यांना असे,
प्रेमानें झुरतात जीव जर ते आजन्म वेड्यापरी,
        आनंदें क्षणमात्र, मी न मग कां गावें तुला सुंदरी?

किंवा दुर्लभ तूं असून मजला गावें तुला मी कसें?
        प्रेमाचें बघणें परी न असतें लाभाकडे फारसे!
विश्वाच्या फुलवाटिकेंत फुललें सौंदर्य जें राजसे,
        त्यातें पाहुनियां दुरून झुरणें हें रम्य भारी असे.

रूपाचा तर गंध दे उधळुनी विश्वांत जा तूं कसा—
        तेणें होउनि धुंद अक्षय मला येथें पडूं दे असा!

---

# त्या क्षणानंतर—

तो भासच सगळा जरी
स्वप्न तें—तरी
हूरहूर जाणव मनांस कां ही परी? १

मावळली मोहक निशा
धवळल्या दिशा
या अजून नयनीं खुपति तारका कशा? २

वाऱ्यावर विरली जरी
गीतमाधुरी
पडसाद अजुनि हे घुमघुमती कां उरीं? ३

ती वरचेवर कौमुदी
पळाली कधीं
हें देहिवर पडलें कसें अचानक मधीं? ४

हा फिकट पांढरा शशी—
राहिली जशी
त्या मोहनिशेची खिन्न स्मृति मानसीं! ५

उधळलीं फुलें ती कुठें
हार कीं तुटे?
निर्माल्य सांडलें पायदळीं मात्र तें? ६

टाकिली कधीं तोडुनी
माळ ती कुणी
तो अचुक वेंचला आणि तेवढा मणी! ७

क्षण हातांतुनि तो गळे
कसा नच कळे
काळाचे मागुनि व्यर्थ पायदळ पळे ! ८

कां उघड्या डोळयापुढें
अजुनि बागडे
तो प्रसंग — आणिक ऊर पुन्हां धडधडे ! ९

कीं स्वप्नच स्वप्नांतरीं
सारखी करी
ही अशी मनाची मोहक फसवेगिरी ? १०

---

# अपुरी माळः—

काय वाटले कुणास ठावें, आलें कांहीं मनीं,
तशीच उठुनी लगबग गेलें जाइजुईच्या बनीं.

निथळत होता बार सुगंधी गर्द ताटव्यावरी,
सांडत होती दौलत खालीं चैत्राची हांसरी.

तेजाच्या ओंजळी भोतुनी पानांपानांवरी,
शिंपित होती सकाळ वरुनी शिडकावा केशरी.

हलक्या हातीं वायू हलवी हळू हळू फुलवरा,
दंवमोत्यांचा सांडत होता खालिं रुपेरी चुरा.

चिमण्या चोंची उघडुनि, छाती डोलानें काढुनी
रानपांखरें नाचत होतीं किलबिल पानांतुनी.

सौंदर्याचा उघडा खजिना पाहुनि भंवतीं असा,
क्षणभर गेली दिपुनि दरिद्री दृष्टीची लालसा.

सुटे चोरटा अंगिं शहारा, जवळी जातां जरा,
सुगंधलक्ष्मी लुटावयाला परि जीव होय हावरा.

तशीच तोडुनि कशीतरी मग फुलें कांपऱ्या करीं,
ओंजळ भरली–आणि परतलें त्याच पावलीं घरीं.

माळ फुलांची तोंच वाटलें कीं गुंफावी तरी,
म्हणून बसलें पाठ उन्हाला देउनि ओटीवरी.

हाताची चालली झरझरा इकडे ही ओंवणी,
तोंच कल्पना गुंफू लागे माळा दुसरी मनीं.

उलगडुनी सर आठवणीचें सूत्र मोकळें करी,
आशेच्या कोंवळ्या कळ्या मग त्यांत सारखी भरी.

घटका सरली-तरि संपेना माळहि इकडे मनीं
फुलें संपली तोंच हातचीं; जागीं झाल्ये क्षणीं

भाव जागच्या जागीं थबकले; विचारही त्यासवें,
शब्द आंतल्या आंत विसरले, कांहिं न मुखिं बोलवे.

सुरेल गुणगुण पळांत मनची वाऱ्यावर पांगली,
आठवलेलीं कडवीं अगदीं ओठावर थांबलीं !

माळ मनांतिल मनांत विरली, धागा सगळा सुटे
हातीं अपुरी माळ राहिली, फूल न उरलें कुठें !

पुन्हां आणखी फुलें तोडुनी आणुं तरी मी कशी,
जगांत जाइल लाज मुकुटिं ही हातावरी ना अशी !

गर्वीअपुरी माळा असली वाहुं कुणाला तरी ?
उदारतेनें प्रेम कुणाचें घेइल करुनी पुरी ?

लावण्याची काय अपूर्णच सदा कळाचातुरी,
सौंदर्याचा संसारच कां असें पांगळा तरी ?

मनीं मुखीं जें वसे, आणखी हातीं जें जें असें,
तें तें सगळें दुर्दैवा, का ठेविसि अपुरें असें ?

अपुऱ्या माळा – अपुरी गाणीं – अपुऱ्या या कल्पना
पायिं वाहते तुझ्या जिवलगा, मानुनि घेशील ना ?

---

# आजीचें घड्याळ—

आजीच्या जवळीं घड्याळ कसलें आहे चमत्कारिक
देई ठेवुनि तें कुठें अजुनि हें नाहीं कुणां ठाउक;
त्याची टिक्‌टिक चालते न कधिंही, आहे मुकें वाटतें;
किल्ली देइ न त्यास तो कधिं; तरी तें सारखें चालतें १

" अभ्यासास उठीव आज मजला आजी पहांटे तरी, "
जेव्हां मी तिज सांगुनी निजतसे रात्रीं बिछान्यावरी.
साडेपांचहि वाजतात न कुठें तों हांक ये नेमकी,
बाळा झांजर जाहलें, अरवला तो कोंबडा ऊठ कीं ! २

ताईची करण्यास जम्मत, तसें बाबूसवें भांडतां
जाई संपुनिया सकाळ न मुळीं पत्ता कधीं लागतां !
" आली ओटिवरी उन्हें बघ ! " म्हणे आजी, दहा वाजले !
जा जा लौकर ! " कानिं तो घणघणा घंटाध्वनी आदळे ३

खेळाच्या अगदीं भरांत गढुनी जातां अम्ही अंगणीं
हो केव्हां तिनिसांज तें न समजे ! आजी परी आंतुनी
बोले, " खेळ पुरे, घरांत परता ! झाली दिवेलागण,
ओळीनें बसुनी म्हणा परवचा ओटावरी येउन ! " ४

आजीला बिलगून ऐकत बसूं जेव्हां भुतांच्या कथा,
जाइ झोंप उडून, रात्र किती हो ध्यानीं न ये ऐकतां !
" अर्धी रात्र फिरे " म्हणे उलटली, " गोष्टी पुरे ! जा पडा ! "
लागे तो घिडधांग पर्वतिवरी वाजावया चौघडा ५

सांगे वेळ, तशाच वार तिथिही आजी घड्याळांतुनी
थंडी पाउस ऊनही कळतसे सारे तिला त्यांतुनी !
मौजेचें असलें घड्याळ दडुनी कोठें तिनें ठेविलें ?
गाठोडें-फडताळ शोधुनि तिचें आलों ! तरी ना मिळे ! ६

---

# चंद्रग्रहण—

सौधतलावर प्राणसखीसह होतों मी सुखशयनीं
तों चंद्राला ग्रहण लागलें प्रभातकाळीं गगनीं !

तें आकाशीं ग्रहण पहाया जागृत झालें सारे,
परि चंद्राला ग्रहण लागलें पृथ्वीवर हें दुसरें !

विलसत होती अर्धकलंकित वर चंद्राची कोर,
इकडे सखिच्या मुखचंद्रावर लोळे कुंतलभार !

ग्रहण पाहुनी नभीं अमंगळ जन सारे हळहळती
हृदयीं परि मम ग्रहण उसळवी आनंदाची भरती !

ग्रहण सुटाया तें चंद्राचें देती सारे दान,
सुटो न माझें ग्रहण कधींहि यास्तव देइन प्राण !

पूर्वमंदिरीं अरुण उगवतां ग्रहण सुटे चंद्राचें,
जिकडे तिकडे हर्ष जाहला, फुललें मुख सृष्टीचें !

हाय ! जाहली गृहकार्यास्तव इकडे जागृत रमणी,
खिन्न जाहलों ग्रहण मनोहर सुटलें माझें म्हणुनी !

चंद्राला ग्रहणें फिरुनि लागतील सहस्रदा !
परि हें ग्रहण मच्चंद्रा पुन्हां लागेल कां कदा ?

---

# चांदणी—

निशा पौर्णिमेची ।–चांदणें नभीं फुलायाची,
व्योमींच्या बाला ।–नाचऱ्या, आनंदी, विमला.
खेळति खेळ कशा ! । खुलल्या तेणें दाहि दिशा !
रम्य अशा समयीं । आंगणीं कुणि प्रेमळ आई—
घेउनि निजतनया । पातली तन्मन रिझवाया.
" चांदोबा, बाळा ! । बघ कसा आकाशीं बसला !
थांब, तुला देतें । राजसा, आणुनि त्यास इथें;
करुं ताइत त्याचा । शोभवूं कंठ लाडक्याचा;
मग हें सोनुकलं । सृष्टिचा राजा शोभेल ! "

आनंदी बाळ । ऐकुनी मातेचे बोल,
बाल्यतरल दृष्टी । आपुली फेंकि नभःप्रांतीं;
असंख्य नक्षत्रें । दिपविती त्याच्या नयनांतें;
किंचित्काल परी । प्रभा ती अवलोकी सारी.
अवचित कोठें तों । नाकळे, बाळ थबकला तो;
नेत्र कुठें न कळे । तयाचे आकाशीं खिळले !
हृदयीं कौतुकला । बोलला मग तो मातेलाः
" आई, बघ, बघ, ती–। कोण ग लकाकते वरतीं ?
दिसते छान कशी ! । पाहते न्यहाळून मजशी.
मऊ ढगांवरतीं—। जाउनी बसली उंच किती !
कोण असे आई । सांग, ही ठाउक मज नाहीं ! "

" बाळ, हिला म्हणती ।–चांदणी, ही प्रभुचीच कृति,
लहानग्या बाळां । देव जरि नेई आभाळां,

ठेवी तरि त्यांसी । चांदण्या करुनी आकाशीं ! ”
सहज वदे माता । सुखविण्या बाळाच्या चित्ता;
तों अवचित कांहीं । तयाच्या विचार मनिं येई;
मग तो मातेला । विचारी प्रश्न हळुच पुढला,—
“ आई, मग अपुला–। ताइ ना देवानें नेली ?
सांग; तिची कोठें ।–चांदणी नभांत चमचमते ?
हीच मला वाटे ।–हीच बघ, ताई ही येथें !
ताई ग ताई ! । धांवुनी खालिं गडे, येई ! ”
वच ऐसें बोले । पसरि तो हात वरी अपुले.

स्मरतां मृत बाला । जीव आईचा विरघळला !
डोळ्यांतुन आलीं । आसवें टपटप त्या कालीं;
कंठहि गद्गदला । एकही शब्द न तिज फुटला !
अश्रूंचा पूर । तिच्या ये नयनीं अनिवार !
परि तो बाळ वरी । पाहुनि एकच शब्द करीः—
“ ताई ग ताई ! धांवुनि खालिं गडे येई ! ”
– तों नभ तें सगळें । दिव्यशा तेजानें दिपलें !
तुटुनी तारा ती ।–निमाली काळोखापोटीं !
जणुं त्या बाळाचे । बोल ते पडतां कानिं तिचे,
गहिंवर तिज आला । भान ती विसरुनि तेजाला
उडी घेत खालीं । महीवर सत्वर त्या कालीं !
‘ ताई ग ताई ! ’ । करुनि तो बाळ वरीं पाही;
पसरी कर दोन्ही । शून्यशा त्या वातावरणीं !

---

## —स

प्रेमाचीं वचनें मनोहर तुवां बाले, दिलीं काल ना,
एकाकी इतुक्यांत आज करिशी कां ही अशी वंचना?
आशेनें बसला उद्यांवरि तरी हा जीव गे टांगुनी,
त्यायोगें हृदयास लागत असे ही सारखी टोंचणी!

प्रेमाचे स्मृतिबंध त्या जखडुनी नेती पुन्हां मागुती,
आशा टाकुनि पाश मोहक परी ओढी पुढें त्याप्रती;
लागे ओढ अती विलक्षण मना मागेंपुढें यापरी,
जीवाचा म्हणुनी प्रवास अडला अर्ध्याच वाटेवरी!

माला ही स्मृतिची तुझ्या निज करें टाकी तरी तोडुनी,
आशेचीं मग मी फुलें नवनवीं आणीन गे वेंचुनी;
किंवा टाक खुडोनि त्या उमलण्यापूर्वीं उद्यांच्या कळ्या,
ठेवोनी हृदयीं बसेन मग या कोमेजल्या पाकळ्या!

कांहीं आठवणी नकोत कसल्या, आशाहि तैशा नको,
जीवाची कलिका अशीच अथवा याच क्षणीं ही सुको!

---

# दारांत—

किति वेळ उभा राहुं तुझ्या मी दारीं ?
रात्र ही अशी अंधारी !

नभ झांकुळती ढग हे काळेमळके,
चांदणी एकहि न फिरके !

हें सांडतसे झिमझिम पाउसपाणी
वळचणी ठिबकती वरुनी !

हा पदर भिजे–भिजले आणिक ओंचे,
तळ गारठले पायांचे !

अंगांत शिरे ही ओल
लागला ढळाया तोल—
ये, कवाड आतां खोल !

तें ममतेचें दार मोकळें असतां,
कां झांकिसि मग हें आतां ?

# दुपारीचीं फुलें

ऐन दुपारीं । फुलली ही छान दुपारी !

रवि टंवकारी सहस्र डोळे.
आगिनधार वरतून कोसळे
निखाऱ्यांत जणुं फुलल्या पोळे
धरणी सारी । फुलली ही छान दुपारी !

झाडावर निर्जीव पालवी,
वेलीवरली उन्हाळली छवि,
कळ्याफुलांवर मुळिं न टवटवी;
मुग्ध बिचारीं । फुलली ही छान दुपारी !

गुलाब दिसती गोरेमोरे,
फिकटपांढरें पडति मोगरे,
जाइजुईंचा नूर ओसरे,
सुकल्या तगरी । फुलली ही छान दुपारी !

दडुनि पांखरें बसलीं सारीं
नभीं मात्र किंचाळति घारी,
जुन्या वडाच्या पारंब्यांवरि
फिरती खारी । फुलली ही छान दुपारी !

सजीव सृष्टीवर ये ग्लानी,
झांपड पडली हिरव्या रानीं;
मंद वाहती जरि कुरणांतुनि—
पाट रुपेरी । फुलली ही छान दुपारी !

नटे कुणास्तव भलत्या वेळीं ?
कळी कशाला फुलवी गालीं ?
गळां फुलांची कशास घाली—
माळ टपोरी ? । फुलली ही छान दुपारी !

कुणा पतीची व्रतस्थ जाया
तयास सजली कीं पूजाया ?
कुणास कीं सामोरी जाया—
देह शृंगारी ? । फुलली ही छान दुपारी !

प्रभात-संध्या-वैभव गाउनि,
कुणा कवीची विटली वाणी,
नवें दृश्य परि आतां पाहुनी
खुलली भारी । फुलली ही छान दुपारी !

उन्हें कोंवळीं खेळतिं जोंवरि,
उगवतीवरी उषा हांसरी,
फुलें नाचतिल किती तोंवरी—
दारोदारीं ! । फुलली ही छान दुपारी !

सरतां वरची शीतळ छाया,
म्लानवदन हो दुबळी दुनिया
धीर तया निजकृतिनें द्याया
खडी सामोरी । फुलली ही छान दुपारी !

अपूर्व तेजोवैभव बघुनी
हर्षभरित हो गंधवती मनिं,
मुग्ध आंसवें कां हीं नयनीं !
येति बाहेरी ? । फुलली ही छान दुपारी !

कोमलता नच कोमेजावी
सौंदर्या अवकळा न यावी,
पुष्पदेवता समाधि लावी
अशा निर्धारीं । फुलली ही छान दुपारी !

भस्मासुर–कोपानल भडके,
तापभयानें धरणी तडके,
भुलवाया मोहिनीच ठाके,
रम्य शृंगारीं ? । फुलली ही छान दुपारी !

चिता पतीची, शय्या जळती,
ळळळळत्या वर ज्वाळा उठती,
प्रसन्नवदना बसावी सती
तशी ही नारी ! । फुलली ही छान दुपारी !

पतिनिधनें आकाश फाटलें,
धैर्य जिचें परि मुळिं न डळमळे,
वागवि कीं कटिखांदां बाळें
सुखें संसारीं । फुलली ही छान दुपारी !

पुष्पवती प्रलयानल जाळी
पुनर्विकसना परि कधिंकाळीं
बीजें हीं कां प्रभु प्रतिपाळी—
पुष्पकेवारी ? । फुलली ही छान दुपारी !

जननिंदेचा वणवा भंवतीं
कडके नृपकोपाशनि वरती;
लोकाग्रणिची प्रशांत वृत्ती
हीच कां हंसरी ? । फुलली ही छान दुपारी !

विश्वोद्धारा जे अवतरती,
प्रहार जगताचे अवगणती,
त्या संतांची विकसे स्फूर्ती
मूर्त आकारीं । फुलली ही छान दुपारी !

रविकिरणांचें तेज प्राशुनी
सदैव हांसत का ही रमणी ?
फुलेल कां ही अशी नंदनीं—
विश्वसंहारीं ? । फुलली ही छान दुपारी !

या तेजस्वी अमरफुलांहीं
होइल तेजोविकास हृदयीं,
विघ्नशतें मग आलीं कितिही—
कोण विचारी ? । फुलली ही छान दुपारी !

जगाचा ताप साहोनी
वृत्ति ज्यांची सदा फुले,
वहावीं आदरें त्यांच्या
दुपारीचीं पदां फुलें !

---

# सुवेझ कालवा

हा सुवेझ कालवा,
थक्क करिल मानवा ! ॥ ध्रु० ॥

दो बाजुस वाळवंट,
नील गगन वर अफाट,
भोंवळ दृष्टीस येत
उष्ण वाहते हवा ! १

खुरट कुठें दिसत झाडि
एकटीच वा झोंपडि
घेउनियां निज मेंढी
अरब कुठें फिरत वा ! २

पकडुनिया दोन जलधि,
जलपथ हा त्यास सांधि,
प्रेमालिंगन–संधी
जन्म दे तया नवा ! ३

पूर्व पश्चिमेस इथें,
कडकडुनी कीं भेटे,
गहिंवर नयनांत उठे
ढाळितसे आंसवा ! ४

नव संस्कृति, नव विचार,
शास्त्रशोध जे अपार,
करित त्यास मुक्तद्वार
हाच हाच कालवा ! ५

धन्य धन्य तो कल्पक,
धन्यचि ते संशोधक
बघुनि यास सहजचि मुख
शब्द वदत ‘ वाहवा ’ ! ६

---

# कल्पनेस—

चल ऊठ कल्पने, सूट दिली तुजला ही
जा, उडुनि भरारा अनंतांत लवलाही!
हा मुग्धपणाचा अडसर फेंकुनि दिधला,
पिंजरा दिलाचा खुला तुझ्यास्तव केला!
तुडवून टाकिलीं पायीं मनिंची तेढीं
तोडिली तशी ती विषण्णतेची बेडी!
हा स्वतंत्रतेचा पुन्हां परतला वारा,
घे पिउनि घटाघट; बंध सुटूं दे सारा!
    बिजलिचे पंख लखलखते । सांवरी,
    स्फूर्ती तव एकवटोनी । आंवरी,
    मग मारी गरुड भरारी । सत्वरी,
जा अंतराळ हें कांपित वर अस्मानीं,
तूं निळावतीची वैभवशाली राणी!

[ २ ]

उजळीत जगाच्या तमोदूषिता अंगा
पूर्वेस वाहते बघ तेजाचि गंगा!
घे कलश भरुनि त्या तेजोमय तीर्थानें
कीं धुवुनि टाकुं जगतांतिल पापीं वदनें!
स्वर्गीय रंग घे दिक्पात्रांतिल भरुनी,
रंगवी 'उद्यां' चें चित्र त्याच रंगांनीं!
तीं रानपाखरें गातीं किलबिल सूर,
दे दिव्य अर्थ गुंफुनी त्यांत भरपूर.

दंवमौक्तिक पानांवरलें । वेंचुनी,
सोनेरी किरणांमधुनी । ओंवुनी,
चल हार तयाचे टाकी । गुंफुनी,
त्या सौंदर्याच्या फडकवुनी जयमाला,
दे धीर आजच्या हिरमुसल्या जगताला !

[ ३ ]

गर्जना करित वर नभीं पहा गंभीर
उधळले ढगांचें चारि दिशा खिल्लार
पकडून त्यांतले मस्त मेघ एकेक
गद्गदां हलवुनी, घाल जगा अभिषेक
बघ नद्या, अरे, कालवे उघडुनी ओंठ
टक लावुनि बसले तुझीच पाहत वाट !
ते आशाव्याकुळ चातक वासुनि तोंडें
बैसले; तयानां थेंब एक लाभूं दे !
शिंपले उघडतीं हृदयें । सागरीं,
होऊं दे स्वातिची वृष्टी । त्यावरी,
कीं फुलतिल मौक्तिकबागा । अंतरीं
हुरमुजी पीक तें तोडुनि दाणेदार
मग सौंदर्याला घाल साज शिणगार !

[४]

कर दूर सृष्टिचा बुरखा हिरवागार
मग लावण्याचें दिसेल तुज भाण्डार;
उपसून काढ वर गंधवतीचा खजिना,
दे वसंतशोभा सदा सृष्टिच्या वदना.
धिप्पाड खडक आंतले पार फोडून
वर जिवंततेचे झरे आण खेंचून ।

कीं अनादिकाळापासुनि निजली बीजें
उठतील, येउनी कोंब तयानां ताजे;
ये दऱ्यागुहा अंधाऱ्या । धुंडुनी,
दे कोहिनूर दडलेले । उधळुनी,
कर रित्या खाणि रत्नांच्या । खोदुनी,
संपदा पडूं दे सगळी उघड्यावरतीं
पावुं दे मानवी कलह जरा विश्रांति.

[ ५ ]

तो अथांग दरिया निळाभोर बघ तिकडे,
धडधडा हलतसे ऊर तयाचें उघडें.
थयथया नाचती लाटा धरुनी फेर,
धर बोट तयांचें, नाच तूंहि चौफेर.
भोंवऱ्यांत बसुनी घे गरगर वा गिरक्या
दे खोल जाउनी पाताळावर धडक्या!
असतील बहरल्या तळिंच्या विद्रुमवली,
वेचुनी कुसुंबी फुलें आण त्यावरलीं!
अप्सरा जळीं निजलेल्या । उठवुनी
त्या नागबालिका साऱ्या । जमवुनी
ये सप्तरसृष्टी सारी । धुंडुनी
चवदाच आणलिस रत्नें पूर्वी जगतीं
ये उरलीं सुरलीं घेऊनि आतां जगतीं.

[ ६ ]

शिर दिमाखांत काढुनी स्फटिकधवलांगा
ती हिमालयावर झळके कांचनगंगा.
बांधुनी ढगांचा तेथुनि झुलता पूल
सरसरा चढुनि वर जा, न चुकवितां तोल.

पसरला पुढें नक्षत्रलोक लखलखता
ओंजळी भरुनि चांदण्या फेंक मग जातां.
तें चंद्रगालिंचें आणहि काजळबोट
कीं लावुं जगाच्या सौंदर्याला तीट.
दे सुधाकुंभ भरलेलें । लोटुनी,
कौमुदी-तडागांहि टाकी । फोडुनी,
अमरत्व वाहवुनि आणी । त्यांतुनी,
जा हलव कल्पतरु नंदनिं जाउनि थेट,
वर्षुं दे फुलांची दशदिशांत बरसात !

[ ७ ]

विस्तीर्ण पसरले विश्व जसें बाहेर
कल्पने, तसें तव अमर्याद माहेर.
चौफेर फिरव आंतून एकदां दृष्टी
फुलवून टाक निमिषांत मनोमय सृष्टी,
जे विचार पडले गळुनि जागच्याजागीं,
स्फूर्तिची चेतना ओत तयाचें अंगीं.
जे करपुनि गेले मनीं भावनाकोंब
कर जिते पाजुनी त्यास दयेचे थेंब;
डोळ्यांत थिजुनि जे अश्रू । बैसले,
ओंठांत अडुनि जें हांसू । राहिले,
कर बांध तयाचे आतां । मोकळे;
कोंदला अर्थ जो शब्दाविण हृदयांत,
तूं खुला तयाला करुनि आण जगतांत !

[ ८ ]

हा टाक फाडुनि पडदा काळा पुढचा,
जीवास दाखवी भाविकाल भाग्याचा !

गतकाळ सुखाची सकाळ बैसे गिळुनी,
स्मृतिसौख्य तरी भेटवी तिचें तूं फिरुनी;
जाळिते मना ‘ आज ’ ची तीव्र जाणीव,
पाजुनी सुधा देवते, शांत कर जीव.
उडवून दूर मज पंखावरतीं नेई,
तव स्वप्नसृष्टिंतुनि अक्षय मजला फिरवी !
करि मनिंची आशापूर्ति । कल्पने,
ध्येय दे आणुनी हातीं । कल्पने,
घडवी मज मोक्षप्राप्ती । कल्पने,
वर उचल सृष्टि वा स्वर्ग खालतीं ओढ,
दे सौंदर्याला चिरंतनाची जोड !

---

# लो. टिळकांचें निधन—

विश्वाची संपली निशा; परि ही दुसरी कसली–
अंधाराची धार अवदसा जगतावर पडली ? १

चराचराची नीज संपली जरि आपोआप,
परी पुन्हां ही कशी येतसे तया काळझोंप ? २

तेजावरती छटा तरंगे कां अंधाराची;
पूर्वदिशेवर छाया पडली कशी पश्चिमेची ? ३

ज्योत जळावी जिथें सुमंगल नाजुक तेजाची,
करपुनि कां ती काळवंडली सीमा क्षितिजाची ? ४

उचंबळावा जिथें प्रभातीं तेजाचा पूर,
दिशादिशांतुनि तिथें कोंदला कां जळका धूर ? ५

अलंकार घालुनी नटे जी अंगीं नवलाख,
सर्वांगाला तीच उषा कां फासितसे राख ? ६

प्रभातलक्ष्मी तिथें मांडिते तेजाचा थाट,
त्या आकाशीं हाय, कशी ही दिसें मसणवाट ? ७

बालरवीची जिथें हलावी शय्या सोन्याची,
पूर्वदिशेवर चिता पेटली आज तिथें त्याची ? ८

वनराजीवर रविकिरणांचा कां न दिसे साज,
तवंग जहरी पसरे तिजवरि कां हिरवा आज ? ९

हास्याचा खदखदा ज्यांतुनि उसळावा पूर,
तीं पुष्पांची चिमणीं तोंडें दिसतीं भेसूर ! १०

वाहतसें जें सदैव गुंगत झुळझुळतीं गाणीं,
तें बर्फासम आज गोठलें ओढ्याचें पाणी ! ११

दंवबिंदूचे जिथें चमकती पाणिदार मोती,
अभद्र शिंपण पडे अश्रुचें त्या सृष्टीवरतीं ! १२

कुठें भरारी भिरभिरणारी ती चंडोलाची,
वातावरणीं धाड लोटली आज गिधाडांची ! १३

पक्ष्यांचे ते कुठे नभांतुनि खुलणारे सूर,
परी अमंगळ तिथें घुमविती घुबडें घूत्कार ! १४

उत्साहाची—आनंदाची जी मंगल वेळा,
त्याच प्रभातीं विश्वावरतीं पसरे प्रेतकळा ! १५

❀ ❀ ❀

महासागरा, सांग कशास्तव पाखडसी प्राण ?
उरीं तुझ्या कां प्रचंड लाटा करिती थैमान ? १६

कां मेघांनों, बडवुनि घेतां धाडधाड ऊर,
ढळढळ नेत्रांतून ढाळतां अश्रूंचा पूर ? १७

अभद्रवाणी गळे काढुनी भलते बेसूर,
विश्वावर कां तांडव करिसी वायो, भेसूर ? १८

परस्परांच्या गळ्यांत पडुनि वृक्षांनों, काय—
अंगाचा तडफडाट करुनी मोकलितां धाय ? १९

जिवाजिवाचें होत तुझ्या कां वसुंधरे, पाणी ?
काळवंडलें तोंड ह्मणुनि हें तव प्रेतावाणी ! २०

चराचराच्या मुखीं पसरली कां ही भीषणता ?
प्रलयकाळ कीं असे पातला विश्वाचा आतां ! २१

कीं शोकें प्रक्षुब्ध जाहलीं पंचमहाभूतें,
त्या भीतीनें धैर्य सोडुनी त्रिभुवन थरथरतें ! २२

ओढुनि घेई स्वर्ग मुखावर मेघाचें जाळ
वसुंधरेच्या तळांत जाउनि दडलें पाताळ ! २३

* * *

हिमालयाच्या विराटदेहीं भरला थरकांप,
कैलासाचें शिखर डळमळे कां आपोआप ? २४

परस्परांना गाढ कवळुनी या गंगायमुना–
शोकभरें ढाळतात ढळढळ कां गंगायमुना ? २५

विव्हळ होउनि विंध्याचल हा पडला निष्प्राण,
शोकाची वाहते नर्मदा तन्नयनांतून ! २६

वीरपदास्तव तळमळणारें सिंधूचें पाणी,
उत्साहाच्या उड्या थांबवुनि हो केविलवाणी ! २७

दिग्विजयाचे पुन्हां न हृदयीं फडकतील झेंडे,
काळवंडलीं कीं अटकेच्या बुरुजांचीं तोंडें ! २८

सह्याद्रीवर मान ठेवुनी महाराष्ट्रमाय–
ही अश्रूंच्या कृष्णाभीमा रडे धायधाय ! २९

स्वातंत्र्याचा–पराक्रमाचा मगंल उदयगिरी,
विषण्ण होउनि बसला निश्चळ तो श्रीशिवनेरी ! ३०

स्वातंत्र्याचें तोरण आतां बांधिल कोण मला,
या दुःखानें तोरणगडच्या कढती द्वारशिला ! ३१

छातीवरती चढेल सरसर आमुच्या कोण पुढें
सिंहगडाचे म्हणुनि धडाधड कोसळतात कडे ! ३२

रायगडाच्या वज्रबळाची कंबर आज खचे !
दगड निखळती शिवरायाच्या पुण्यसमाधीचे ! ३३

उठे शहारा कडेकपारीं गडागडावरतीं,
डोंगरझाडींतून सारखी थरथरते भीती ! ३४

सर्वांगांतुनि कडकडणारा निवुनी अंगार,
प्रतापगडची पडे भवानी ती हिरवीचार ! ३५

चराचराचा असा कशास्तव होई थरकांप,
कीं देशाच्या दुर्दैवाचें ओढवलें पाप ! ३६

  

अकस्मात कीं हा प्रलयाचा हो विद्युत्पात !
विश्वावरतीं काय कडाडे हा वज्राघात ! ३७

मध्यान्हीचा प्रखर प्रभाकर भर दिवसा लपला,
तेतिसकोटी नक्षत्राचा चांद आज तुटला ! ३८

राष्ट्रदेविच्या कंठामधला कौस्तुभ कोसळला
आर्यभूमिच्या सौभाग्याचा पुसला आज टिळा ! ३९

पतिव्रतेच्या पुण्याईची अभंग वज्रचुडा—
आज मोडुनी सौभाग्याचा पडे तिच्या तुकडा ! ४०

ऋषीश्वरांच्या तपोबलाचें सरलें भांडार !
वीरवरांच्या पराक्रमाची बोथटली धार ! ४१

दीनोद्धारा रिपुसंहारा करुनी लवलाही,
क्षीरसागरीं निजले भगवान् पुन्हां शेषशायी ! ४२

अन्यायाची असुरी सत्ता विध्वंसुनि पार,
निजधामाला जात असे कीं दाशरथी वीर ! ४३

गोकुळांतल्या गोपाळांचा हा पालनवाला,
काय कालियाडोहामाजीं कंसारी बुडला ? ४४

कीं वज्रासम जो वचनाचा पर्वत खंबीर,
भीष्म काय शरपंजरीं पडे तो रणझुंजार ! ४५

परमेशाचा-जो धर्माचा साक्षात् अवतार,
पडे युधिष्ठिर आज तोच का सत्याचा वीर ! ४६

त्रिखंड जी जयनाद गाजवी ब्रह्मांडामधुनी,
आद्यऋषींची त्रिकालदर्शी सरे वेदवाणी ! ४७

भगवंताची मुग्ध जाहली कीं भगवद्गीता,
सुदर्शनाच्या पराक्रमाची सरली उज्वलता ! ४८

धारातीर्थीं पडे धुरंधर आज धनुर्धार,
शांत जाहला कोदंडाचा आज टणत्कार ! ४९

आर्यत्वाची–वेदांताची–गीताधर्माची,
दिग्विजयाची ध्वजा कडाडे कीं आचार्यांची ! ५०

ज्ञानेशाची आज थांबली ओजस्वी ओंवी,
जी गीतेचें रहस्य जगता उलगडुनी दावी ! ५१

निःस्वार्थाची–निर्भिडतेची–आत्मप्रत्ययाची,
अभंगवाणी आज ओसरे ती श्रीतुकयाची ! ५२

जिनें गाइलीं स्वातंत्र्याची–स्फूर्तीची गाणीं,
ती दासांची मुग्ध जाहली अवतारी वाणी ! ५३

छत्रपतींचा नव्या युगांतील सरला अवतार,
लपलीं म्यानीं पुन्हां भवानी आजच तलवार ! ५४

स्वातंत्र्यास्तव रक्त सांडुनी जो गेला गाजी,—
सिंहगडचा सिंह काय तो पडला तानाजी ! ५५

धैर्यधुरंधर पडे धनाजी किंवा वीरमर्णी,
दुष्मानांचीं पितील घोडीं संथ आज पाणी ! ५६

हिंदुस्थानीं निजशौर्याचा गाजवुनी डंका,
पुण्यपुरीचा तो रणगाजी बाजी पडला कां ? ५७

नांव जयाचें ऐकुनि पळती रिपु रानोमाळ,
मल्हारी हरपला शत्रुचा तो कर्दनकाळ ! ५८

करी प्रतापी पातशहाच्या तक्ताचे तुकडे,
पानपतावर तोंच सदाशिवभाऊ आज पडे ! ५९

प्रतापशाली, सेनासागर, अकलेचा खंदा—
आज निमाला मर्द मराठा महादजी शिंदा ! ६०

पानपताची सरे लढाई किंवा ही चवथी,
स्वातंत्र्याची दौलत फिरुनी ढासळली चढती ! ६१

अष्टयाचा संग्राम थांबला किंवा घनघोर,
आणि निमाला स्वातंत्र्याचा शेवटचा वीर ! ६२

रजपूतांच्या रमणी अथवा करिती जोहार,
निजप्राणांचा आर्यसती कीं देती आहेर ! ६३

आज विषाचा प्याला किंवा घे कृष्णाबाई,
झांशीची हरपली रणावर ती लक्ष्मीबाई ! ६४

पडला अथवा चौखंडांतुनि गाजवुनि कीर्ती,
स्वातंत्र्याचा शूर शिकंदर हा धारातीर्थी ? ६५

चितोरगडच्या जंगलांतल्या त्या रणसिंहाची,
सिंहगर्जना आज थांबली प्रतापसिंहाची ? ६६

आज उतरला दख्खनच्या कीं दौलतिचा नूर,
हिंदभूमिचा काळवंडला आज कोहिनूर ! ६७

आर्यभूमिच्या आनंदाचा ढासळला स्वर्ग,
कीं आग्र्याचा ताजमहालच पावतसे भंग ६८

* * *

मांगल्याची–उज्ज्वलतेची–सत्याची खाण–
ऋषीश्वरांचें–पतिव्रतांचें जें जागृत स्थान– ६९

पराक्रमाचें, जें बुद्धीचें मंगल माहेर-
विश्वाच्या लक्ष्मीस खेळण्या जें क्रीडागार- ७०

स्वर्गाची कल्पना ढासळे जी भूमी बघतां-
परम उज्ज्वला, महन्मंगला ती भारतमाता ! ७१

सर्वस्वाची तिच्या गुणांची जिथें दिव्य खाण-
ज्या स्थानीं नांदती अहर्निश तिचे पंचप्राण- ७२

आनंदाच्या तिच्या खेळती आशा ज्या धामीं
ती मर्दांची माय माउली महाराष्ट्रभूमी ! ७३

गोब्राह्मणप्रतिपालक प्रसवे जी श्रीशिवराय,
राष्ट्रतिलक हा तीच प्रसवली महाराष्ट्रमाय ! ७४

कोंडाण्याचा जिच्या कडेवर बसे वीर तान्हा,
हृदयावरती बाळ खेळला तिच्याच हा तान्हा ! ७५

सौभाग्याचें तिच्या रंगवी जों न चित्र काळ—
इतिहासाचें पान फाटलें तों हें अवकाळ ! ७६

घाव अचानक कसा बसे हा उलट्या काळाचा,
कडकडला खंबीर खांब हा मराठशाहीचा ! ७७

* * *

हाय ! हाय ! जें नको बोलणें तेच मुखीं आलें,
नको-नको जें कधीं पाहणें तें बघणें आलें ! ७८

गीतफुलांनी ज्या वीराची काया सजवावी,
तीच वाहणें समाधीवरी नशिबाला येई ! ७९

नको खळखळूं, नको अडखळूं–माझे वाग्देवी,
धडा जीवाचा करुनि एकदां हें गाणें गाई ! ८०

नको सळसळूं, नको डळमळूं हृदया, बेताल,
एकच क्षणभर धरी आपुला धडधडता ताल ! ८१

थाप डफावर देत देत या सगळे शाहीर,
गातांना मम उरांत तुमचा द्या क्षणभर धीर ! ८२

*   *   *

नामर्दांनों, ही रडण्याची असे काय वेळ ?
तोडुनि टाका चला अमंगळ अश्रूंची माळ ! ८३

वेळ कोणती कुठें तुम्ही तें पहा जरा नीट,
दुबळी दृष्टी करा आपुली एकवार धीट ? ८४

रणमर्दांच्या जिथें गर्जना घुमती गंभीर,
रणभूमीवर तिथें काढतां रडण्याचे सूर ? ८५

रक्त सांडलें ज्या भूमीवरी तुमच्या बापाचें,
तिथें टाकतां अभद्र जळ कां तुमच्या अश्रूंचें ? ८६

हा राष्ट्राचा–हा मर्दांचा मंगल संसार,
कोण कुणास्तव भ्याडपणानें येथें रडणार ? ८७

कर्तव्याचा एकच येथें सर्वांना छंद,
मायेचे तुटतात तडातड इथें सर्व बंध ! ८८

निःस्वार्थाची–निर्भयतेची घेउनि तलवार,
स्वातंत्र्यास्तव–सत्यास्तव हा लढला रणधीर ! ८९

पराक्रमाची दिगंत त्याच्या गाजतसे कीर्ती,
कार्य तयाचें सरलें ! करितां शोक कुणासाठीं ? ९०

दंड ठोकुनी तर मर्दांनों, चला पुढें सरका,
स्वातंत्र्याचा धरुनि सांवरा पडता जरिपटका ! ९१

द्वेष मनांतिल टाकुनि भिडवा खांद्याला खांदा,
ऐक्याचा नाचवा शिरावर तो भगवा झेंडा ! ९२

पराक्रमाचें रक्त नसांतुनि उसळविलें ज्यानें-
मृत आशांतुनि प्राण घातला ज्या रणमर्दानें- ९३

उत्साहाच्या ज्या शूरानें भडकविल्या ज्वाळा,
त्या वीराचा-त्या धीराचा जय ! जय ! जय बोला ! ९४

जय टिळकांचा ! जय सत्याचा ! ! जय स्वातंत्र्याचा ! !
जय जनतेचा ! जय जय आमुच्या भारतमातेचा ! ! ! ९५

दिशादिशांतुनि भरो सारखा हा जयजयकार !
महागर्जना ही विश्वाचें हलवो प्राकार ? ९६

दुष्मानाच्या बसे उरीं मग भीतीनें धडकी,
दास्याच्या नरकांतुनि उठतिल प्रेतेंही सडकीं ! ९७

मुर्दाडांना मर्द करिल हा मंगल जयनाद,
उत्साहाचा जिवाजिवांतुनि उठविल पडसाद ! ९८

महाघोष हा गर्जत राहिल मग वातावरणीं,
दहा दिशांतुनि देव धांवतील ऐकाया गगनीं ! ९९

पुण्याई मग कां न फळाला आमुची येणार ?
स्वराज्यगंगा भारतवर्षीं कां न वर्षणार ? १००

---

# लज्जागीत

लाज गडे लाडके !–एकदां लाज गडे पुरती !
हृदयाची एवढीच आशा आतां या जगतीं !

तव लज्जेचें गुलाबपाणी लाजत वाहूं दे !
मृदु वर्षावें त्या ही सगळी सृष्टी लाजूं दे !

लाजत लाजत खेळ खेळती लज्जेच्या पुतळ्या,
आकाशाच्या निळ्या अंगणीं या वेळीं सगळ्या.

ज्योत्स्नेच्या बुरख्यांतुन बघ ही अल्लडशी पोर—
हळूच बघते लाजलाजरी चंद्राची कोर !

त्या लज्जेची मंगल गंगा पाझरते खालीं,
विश्व लाजते, रजनी तर ही त्यांतच विरघळली !

प्रभात–देवी लाजुनि बसली या क्षितिजामागें,
अरुण उगवतां नाचत हांसत बघ येईल वेगें !

पक्षी निजले ! पुष्पें निजलीं ! निजल्या फुलवेली !—
निजल्या कसल्या ! लज्जेनें परि निश्चल तीं झालीं !

वाग्देवी ही माझी लाजे गातां या समयीं,
काव्यस्फूर्ती जागी असुनी ताळ्यावर नाहीं !

लज्जेचें लागलें असें हें वेड पुरें जगता,
' लाजा ! लाजा ! ' चराचरांना वदतें तें आतां !

लाजायाची लाज कशाला मग तुजला व्हावी ?
लाज गडे हं ! हळुंच लाज ग !—कुणि पाहत नाहीं !

हृदयीं वसला जरी आपुल्या प्रीतीचा मेळ,
वदनिं तुझ्या सारखा पडेलची लज्जेचा खेळ !

तव गालीं लज्जेची फुलत्या लाव बागशाई !
भिजव सारखी प्रणयाश्रूंच्या तिजला वर्षावीं !

प्रीतीची फुलवेल फुलव तव लज्जा–पुष्पांनीं !
–धरीन हृदयीं मग ही नाजुक लाजाळू राणी !

प्रीतिदेवते ! उधळ हिच्यावर लज्जेचा रंग !
लज्जेच्या रोमांचें सगळें थरथरूं दे अंग !

प्रेमचितान्या, एकसारखी लज्जा–चित्रें हीं,
कपोल–फलकीं हिच्या मनोरम रंगवीत राहीं !

प्रेम-शारदा-प्रवाह थांबवि तव मिटल्या वदनीं,
गालावर कीं फुटती त्याच्या लज्जा–निर्झरिणी !

खुल्या मनाचा भाव कळाया शब्दाची आशा—
कशास तुजला ? लज्जा केवळ प्रणयाची भाषा ?

लाल पताका या लज्जेच्या–छे !–भगवे झेंडे !—
प्रणयाच्या किल्ल्यावर या तव अक्षय फडकूं दे

विश्व मरो वा तरो तयाची कोण करी परवा ?
या चित्राचा लाभ सदोदित मम नयनां व्हावा !

ध्यानीं स्वप्नीं अशी दिसावी लज्जेची मूर्ती !
मरतांनाही दृश्य असावें हें डोळ्यांपुढतीं !

“ अशीच क्षणभर उभी रहा ! ”–कीं तुज बघतां बघतां—
लाजत अस्फुट सुरांत गाइल कवि लज्जा–गीता !

---

# हिमपतन

[ ता. २५ डिसेंबर १९२७ रोजीं लंडन येथें झालेल्या अपूर्व हिमवृष्टीस उद्देशून प्रस्तुत कविता लिहिलेली आहे. ]

धन्य ! धन्य ! आज धरा धवलरूप झाली ॥ ध्रु० ॥

गगनांतुनि हिम न झरे, अमृताचे गळति झरे,
स्वर्गंगा आज सहज धरणीवर आली ! १

कौमुदींत शशि वितळे, रजतकांति कीं निथळे
तेजाच्या सागरांत अवनि कीं बुडाली ? २

दुग्धाचा झरत पूर, मोत्यांचा गळत चूर,
खाण हिऱ्याची फुटली काय अंतराळीं ? ३

नाचति सुरबालिका, फुटति म्हणुनि तारका ?
किरणांचें कण सांडति अविरत का खालीं ? ४

शुभ्र पारिजातका बहर आज येत का ?
पुष्पांचा म्हणुनि सडा पडत भोंवतालीं ! ५

धवलसृष्टि, धवल गगन, दशदिशाहि धवलवदन,
प्रगट मूर्त रूपें कीं धवलता जहाली ? ६

वृक्षवेली शुभ्रपर्ण, फत्तरही स्फटिकवर्ण
संगमरवरी स्वरूप सदनें हीं ल्याली ! ७

सप्तरंग एकजीव होति, त्यजुनि भेदभाव,
शुभ्रकांति विलसे मृत कृष्णता कपोलीं ! ८

अंधकार आज मरे, नैराश्यहि सकल सरे,
पुण्याची कीं पहांट म्हणुनि ही उदेली ! ९

आशा, पावित्र्य, प्रेम, बांधिति हे धवल धाम
राहिल का सतत असें जग भविष्यकालीं ? १०

---

# पानाआड फूल—

पदराआडुन कीं आईच्या हें गोजिरवाणें
बाळ तान्हुलें वदन आपुलें दावित का चिमणें ?

मूल नव्यानवसाचें पहिलें लागुं नये दृष्ट
झांकुनि घेते फुलवेलीं तें ह्मणुनि काय नीट ?

फुलाफुलांचा वनीं चालतो नित्य लपंडाव
फूल चिमुकलें छपून बसलें हें त्यांतिल काय ?

पुष्पबालिका नटली हिरवी साडी नेसुनि का
लाजाळू लाजून बैसली, कीं पाहिल कुणि का ?

हिरवा बुरखा डोक्यावरचा किंचित् सारून
कुळवंताची बाला बघते ही डोकावून ?

किंवा नाजुक वेष घेउनी निसर्गदेवी ही
लपून बघते हळुच आपली अपूर्व चतुराई !

यक्षकन्यका गर्व करित का निजसौंदर्याचा—
बसली हिरवा महाल बांधुनि हिरव्या पानांचा ?

शापभ्रष्ट अप्सरा काय ही स्वर्गातुनि पडली,
लाजुनि म्हणुनी रानफुलांच्या मिषें इथें दडली !

कीं पदराच्या आड दडवुनी प्रेमपत्रिका ही
मुक्या मनानें वाचित बसली वनलतिकादेवी ?

अक्षय करितें जगत आपुली विटंबना म्हणुनी,
प्रीतिदेवता काय बैसली ही येथें दडुनी !

परागशर कीं रोखुनि दडली मदनाची स्वारी
चुकल्यामुकल्या तरुणावरती करण्यास्तव स्वारी !

किंवा झुकवुनि वेड्या प्रणयी फूलपांखराला
खेळ प्रीतिचे खेळे त्याच्या हृदयाची बाला !

प्रेमाच्या प्राप्तीस्तव कोणी प्रेमाचे वेडें—
प्रेमसमाधी लावुनि बसलें येथें एकिकडे ?

अस्फुट दडतें अस्फुट फुलतें हें वनदेवीचें—
हृदयांतिल का काव्य मनोहर फुलत्या प्रीतीचें !

लाजलाजरा कवी कुणी का हा प्रतिभाशाली
निवांत निजला पांघरून या पानांच्या शाली ?

सरस्वतीच्या वेलीवरल्या पानीं दडलेला—
गातो ‘ केशवकुमार ’ दडत्या पुष्पाची लीला.

---

# फूलपांखरें

सृष्टीच्या हृदयावरतीं
अक्षय भरभर हीं फिरतीं;
वाऱ्यांतुन मारित गिरके,
स्फूर्तींचे आलाप मुके—
घेत नवनवे,
जीवेभावें,
खंड न ज्या, ते-हेच बरें-
कविरायाचे गुरु खरे !

फुललेल्या ताटव्यांतलीं,
फुलें मनोहर जीं दिसलीं;
चुंबून तयां हंसवावें,—
क्षणांत मग दूर पळावें;
यांच्या लीला—
या हृदयाला,
वेड लाविती खरेंखुरें;
आणिति काव्याचें वारें !

बांधावर हिरव्यागार
निसर्ग-बाला सुकुमार;
बहार नवतीचा पहिला—
देहिं जयांच्या मुसमुसला !-

त्या वेलींचे—
प्यार जीविंचे !
कारण, त्या शिकविती गडे,
हीं प्रीतीचे गोड धडे !

वनदेवीचा लडिवाळ
एकुलता निर्झरबाळ;
बालरूपिणी सरस्वती
काव्यमया ज्याच्या गीतीं;
अखंड वाहत
तरंग उधळित,
ते हीं मनिं सांठवितात-
हिंडुनि या कांठोकांठ !

जाइजुईमोगरिंमधुनि—
कांटेऱ्या कुंपणांतुनी—
नाच सदा चाले यांचा,
ध्यास यांस हा नित्याचा,
यां न विसांवा,
यां नच थकवा,
करिति विलक्षण तप किंवा
भुलवाया कुठल्या देवा !

फूलपांखरांनों, तुमचें—
वेड एक हें दिव्याचें !
जडतेची जडता हरुनी—
स्फूर्तीला जागी करुनी—

ब्रह्मांडाला,
नाचायाला—
लाविल ! ही जादू तुमची !
कधिं न कुणां उमगायाची !

दिव्याच्या पायांमधले,
हे हलते घुंगुरवाळे;
नाद तयाचे जे उठती,
हृदयाच्या हृदयीं शिरती !
मग जे उमटत,
तेथुनि अस्फुट—
प्रतिध्वनी, कुणि त्या वदती—
' कविरायाची रसवंती ! '

---

# प्रभाततारा

प्रभात झाली, दिशा निवळल्या मावळली रजनी,
ब्रह्मांडाच्या डोळ्यावरची ओसरली ग्लानी !
फेर थांबला आकाशींचा दमल्या सुररमणी,
एका मागुनि एक घरोघर त्या गेल्या निघुनी.
स्वर्गाच्या कुंजांत एकटी खिन्न वदन करुनी,
वाट कुणाची बघते अजुनी ही ताराराणी ?

*   *   *

सोडुनि गेल्या सर्व मैत्रिणी अवचित काय हिला,
स्तब्ध राहिली ह्मणुनि भयाकुल होउनि ही बाला ?
कीं आकाशीं वेंचुनि नेलीं फुलें अप्सरांनीं,
फूल त्यांतलें एक राहिलें एवढेंच चुकुनी ?
बालरवीच्या स्वागतार्थ कीं गगनश्री नटली,
तिनें लाविली काय कपाळीं वर्खाची टिकली ?
जाण्याच्या घाईंत रजनिचा चंद्रहार तुटला,
त्यामधला हा हिरा सांडुनी काय नभीं पडला !
गगनाच्या तबकांत लावुनी काय निरांजन हें—
कुणी उगवत्या परमेशाला ओवाळित आहे ?
कुणास झाली उषा–रवीच्या लग्नाची घाई,
मंगलाक्षता ह्मणुनि उधळली वधूवरांवर ही !
गगनश्रीला सोडुनि जातां विरही चंद्राची,
ही आशा कीं एक तिच्यावर उरली शेवटची !
मृतशय्येवर पडली रजनी कीं तेजोहीन,
कंठीं घोंटाळतो काय हा अजुनि तिचा प्राण !

स्वर्देवीच्या विरहाची कीं वेळ सरत आली,
ओझरतो हा आनंदाचा अश्रु तिच्या गालीं !
कुणा विलासी गंधर्वाचें विमान हें अजुनी—
प्रभात झाली तरी फिरतसें एकटेंच गगनीं !

* * *

हळुंच कुणी इतुक्यांत उघडिलें पूर्वेचें दार,
बावरली विरहाकुल तारा, सुटे सर्व धीर !
सोन्याचा पोषाख चढवुनी तो सूर्यापुढती,
हांसत हांसत तिचा चिमुकला आला प्राणपती !
"–हृदयेशा, जागलें रात्रभर किती तुम्हांसाठीं—
पुरे गडे–जिवलगा, पाहतां आतां अंत किती !–"
बघतांबघतां नाचत मुरकत ती चंचल पुतळी,
क्षणांत लपली रविकिरणाच्या कोमल करजालीं !

---

# संगीत-श्रवण

बाले, थांब जरा-क्षमा कर-तुझें गाणें करी हें पुरे,
  झाला व्याकुळ जीव-धीर हृदयीं आतां न कांहीं उरे;
कांठाला भिडली शराब अगदीं ! प्याला जिवाचा भरे;
  आतां थेंबही टाकशील तर हा सांडेल सारा बरें !

गाण्याची चढली निशा, बहिरल्या बेभान या भावना,
  रोमांचांतुनि कांपरें थरथरें, माझें मला भान ना !
जीवाचा चुकणार तोल बघ हा ! आतां सखे, सांवरी-
  तारूं हें फुटकें बुडेल भरल्या दर्यामधें ना तरी !

वाहोनी सरिताजलावरि जशी जातीं फुलें सागरीं
  माझे प्राण तसे सुरासह तुझ्या गेले अनंतोदरीं,
गीत-ब्रम्हजलांत जीव पडतां आतां असा पोहणी
  सारें जीवनगीत होय मजला बेसूर हें साजणी,

बोलूं काय पुढें ?-न शब्द उमटे-चाले न हा श्वासही,
  बाले, यास्तव टाकितों क्षणभरी स्कंधीं तुझ्या मान ही।

# प्रेमाची शिकवण

" रानपांखरा, थांब क्षण जरा,
करिसि कां सुरेल सदा ही मुशाफरी ? "
" त्या वडावरी, चिमुकल्या घरीं,
बैसली धनीण तिला पूस जा तरी ! " १

" भृंगराजया, फिरसि कासया,
हा गुंजनमंत्र मधुर तुज कुणी दिला ? "
" हृदय उघडुनी, बसत कमळिणी,
त्या तळ्यांत; जा, सवाल टाक हा तिला ! " २

" प्रेमरागिणी, शिकविली कुणी—
पंचमांत गावयास कोकिलावती ? "
" मोहरावरी, फुलफुलांवरी,
हांसती वसंतराज, पूस त्याप्रती ! " ३

" निर्झरा गड्या, टाकिसी उड्या
पर्वतावरून कसें भय न मुळिं तुला ? "
" बघ पल्याड ती, गाढ जलवती,
' भय न मजसि कां ? ' विचार जाउनी तिला ! " ४

" नील नभपटीं, कां उषावती,
रेखितेस नवसुरंग चित्रवल्लिका ? "

“ अरुणराज ते, हंसति ना तिथें ?
रंगकुशल चित्रकार, पुससि त्या न कां ? ” ५

“ काव्य राजसा, गासि का असा,
गानवेड हृदयिं तुझ्या भरविलें कुणी ? ”
“ केतकीबनीं, बैसलें कुणी;
कसलें हें वेड तिला पूस जाउनी ! ” ६

---

# पुस्तकांतील खूण

वाचनाला सुरवात कुठें केली,
दोन पानें वाचून जों न झालीं;
तोंच हांसत मागून कुणी आलें,
आणि पुस्तक तात्काळ जप्त केलें !

"पुरे गोष्टी वाचणें ! करा गोष्टी !"
म्हणे, "फिरवा क्षणभरी वरी दृष्टी !"
म्हणीं शिरिंची काढून तिनें पात—
केवड्याची घातली पुस्तकांत !

दिवस झाले त्याजला किती आतां !
सहज पुस्तक ये आज तेंच हातां;
केवड्याची त्यांतली बघुनि खूण
सुखस्मृतिनें मन जात गहिंवरून !

जिथें वाचन एकदां थांबलें तें
अडुनि बसलें आहेच अजुनि तेथें !
फिरुनि फिरुनी उघडितों तेंच पान
आणि प्रेमें हुंगितों तीच खूण !

---

# टीपा :

**पान १३**—' होय म्हणतांना ' या कवितेंतलि शेवटच्या दोन ओळीचा अर्थ दुर्बोध आहे अशी तक्रार मागें कोणी केली होती. तथापि, त्या ओळी कळावयास फारशा कठीण वाटूं नयेत. रुकार देणारी रमणी भावनातिशयानें गलितगात्र होऊन रमणाच्या बाहूचा आश्रय घेते व या तिच्या अवस्थेचाच उल्लेख ' ओल्या गुल्छबूचा ताटवा कोसळे ' असा केलेला आहे.

**पान १८**—कै. अनंततनयांना उद्देशून ही कविता रचलेली आहे व ती त्याच मथळ्याखालीं मूळ प्रसिद्ध झालेली आहे.

**पान २८**—ही कविता अत्यंत अल्पवयांत निधन पावलेल्या माझ्या बहिणीस उद्देशून केलेली आहे.

**पान २९**—मागें जुन्नर येथें गेलों असतां एका गोंधळ्यानीं गायिलेला पोवाडा ऐकून ही कविता सुचलेली आहे

**पान ३५**—ही कविता मुंबईच्या फूटपाथवर निजणाऱ्या मजूरांना पाहून सुचलेली आहे.

**पान ४५**—ही कविता ' मनोरमा ' मासिकाच्या पहिल्या अंकासाठीं रचलेली होती.

**पान ५६**—प्रकाशित अशी ही माझी पहिली कविता. ' केशवसुताची छाया या कवितेवर पडलेली आहे, ती पुढें पडूं न देण्याची काळजी राखावी ' असें गोविंदाग्रजांनीं ही कविता वाचून सांगितलें होतें.

**पान ६४**—१९२७ ऑगष्ट महिन्यांत इंग्लंडला जात असतांना या कालव्यांतून जाण्याचा प्रसंग आला. बोटीच्या डेकवरून कालव्याचा देखावा पहात असतांना मनांत जे विचार आले ते या कवितेंत व्यक्त केले आहेत.

**पान ७१**—ही कविता ' अकरावा अवतार ' या नांवानें टिळकांच्या मृत्यूनंतर पहिल्याच पंधरवड्यांत पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाली होती.

---